सुधारकांचे अग्रणी, विद्वानांचे शिरोमणी,
उदारांचे राजे

# पण्डित ईश्वरचंद्र विद्यासागर



लेखक
साने गुरुजी



सप्टेंबर ] किंमत १॥ रुपया [ १९४५

प्रकाशक :
दयार्णव रघुनाथ कोपर्डेकर,
५२९ सदाशिव, पुणें २.



प्रथमावृत्ति १९२७
पुनर्मुद्रण १९४५





मुद्रक :
श्रीपाद रघुनाथ राजगुरु,
राजगुरु प्रेस,
४०५ नारायण, पुणें २.

माझ्या आईच्या
पूज्य स्मृतीस भक्तिप्रेमानें
समर्पण.

# आमचें प्रकाशन

| | | | |
|---|---|---|---|
| तीन मुलें | (कादंबरी) | साने गुरुजी | २—८—० |
| क्रांति | ,, | ,, | ३—०—० |
| स्त्री-जीवन, भाग १ व २ | | ,, | ३—०—० |
| राष्ट्रीय हिंदुधर्म | | ,, | २—०—० |
| समाजधर्म | | ,, | ०—१२—० |
| समाधीवरलीं फुलें | (कथा) | वि. स. खांडेकर | २—०—० |
| आबा | (कादंबरी) | वि. वि. बोकील | ३—०—० |
| मंगळागौरीच्या रात्रीं | ,, | ,, | २—८—० |
| अत्तराचे दिवे | ,, | ,, | १—८—० |
| मीना-नीना | (नाटक) | ,, | १—०—० |
| माईची माया | (नाटिका) | ना. धों. ताम्हनकर | १—०—० |
| बोलघेवड्या | ,, | ,, | ०—१२—० |
| कडू साखर | (कथा) | ग. ल. ठोकळ | १—८—० |
| सुगंध | ,, | ,, | २—०—० |
| सुगी | (काव्य) | ,, | १—४—० |
| काव्यकलेचें अंतरंग | (प्रबंध) | के. नारखेडे | २—०—० |
| जागत्या छाया | (कथा) | अनंत काणेकर | २—०—० |
| चौफुला | | आचार्य भागवत | १—०—० |
| समाज आणि समाजसेवा | | काका कालेलकर | १—०—० |
| मानलेलीं मुलें | (कथा) | मा. भ. नंदुरकर | १—८—० |
| आगरकर चरित्र | | पु. पां. गोखले | ०—६—० |
| पांढरपेशांचें जग | | श्री. ज. जोशी | १—८—० |

प्रकाशकः—द. र. कोपर्डेकर, ५२९ सदाशिव, पुणें २

# प्रस्तावना



गेल्या शतकाच्या उत्तरार्धांत बंगालमध्यें ईश्वरचंद्र विद्यासागर ह्या नांवाचे एक फार थोर गृहस्थ होऊन गेले. त्यांचें नांव बंगाली लोकांना अत्यंत प्रिय झालेलें आहे. ईश्वरचंद्र हे अत्यंत बुद्धिमान्, बाणेदार, आईबापांस देवासमान भजणारे, दीर्घोद्योगी व दयाशील गृहस्थ होते. त्यांची कामगिरीही विविध प्रकारची आहे. त्यांनीं बंगालमध्यें संस्कृत-महाविद्यालय, स्त्रीशिक्षण, विधवा-विवाह, एकपत्नित्व इत्यादि विविध चळवळींचा पुरस्कार करून व त्याप्रीत्यर्थ सर्व प्रकारची झीज सोसून आपल्या बांधवांची सेवा केली आहे. ह्यामुळें वंदनीय विभूतींमध्यें त्यांची गणना केली पाहिजे.

पण्डित ईश्वरचंद्र विद्यासागर ह्यांचें चरित्र विद्यार्थीवर्गाला अनेक दृष्टींनीं मार्गदर्शक होण्यासारखें आहे. विद्यासागरांची बुद्धिमत्ता जरी प्रयत्नसाध्य नसली तरी पितृभक्ति, दीर्घोद्योग व स्वबांधवांचें दुःख हलकें करण्याकरितां कोणतेही कष्ट करण्याची तयारी हे त्यांचे गुण प्रत्येकाला थोड्या तरी प्रमाणांत प्राप्त करून घेतां येण्यासारखे आहेत. ईश्वरचंद्रांप्रमाणें जरी विद्यासागर होतां आलें नाहीं तरी दयासागर होण्याचा प्रयत्न केल्यास आपल्या जीविताचें सार्थक होईल असा माझा दृढ विश्वास आहे. स्वजनांची सेवा करीत असतांना सुद्धां त्यांच्यांतील कांहीं लोकांच्या गैरसमजुतीमुळें किंवा रूढीप्रियत्वामुळें आपणांस हालअपेष्टा सोसाव्या लागतात, त्यांचे बोल सहन करावे लागतात. त्यांच्याकडून प्रसंगीं आपला छळही होतो. इतकें झालें तरी कार्यावर नजर ठाम ठेवून, त्यांच्यांतच राहून, चिडून न जातां, वैतागून न जातां, थोर पुरुष आपलें ध्येय गांठण्याचा कसा प्रयत्न करितात ह्याचें ईश्वरचंद्र विद्यासागर हें एक उत्कृष्ट उदाहरण होय. कार्यकर्त्या स्त्रीपुरुषांनीं हा बोध नेहमीं मनांत वागविला पाहिजे, तरच मोठमोठीं कामें तडीस नेणें शक्य होईल.

बुद्धिमत्ता ही ईश्वरी देणगी आहे. परंतु सद्गुण प्रयत्न केल्यास संपादितां येतात. सद्गुणांची वाढ करणें हें शिक्षणाचें ध्येय असलें पाहिजे. या दृष्टीनें विचार केला असतां अशी चरित्रें हीं उत्तम शिक्षक होत. रा. साने हे शाला-गृहांतच मुलांना पढवून समाधान मानणारे शिक्षक नसून मुलांच्या मनाव

सद्वर्तनाचा ठसा कायमचा उमटावा म्हणून हा त्यांचा प्रयत्न आहे. रा. साने हे चांगले लेखक आहेत; त्यांनीं ह्यापूर्वी लिहिलेलें कै. गोपाळराव गोखले ह्यांचें चरित्र विद्वानांना पसंत पडलें आहे. तेव्हां प्रस्तुत चरित्राविषयीं विस्तारानें लिहिण्याचें कारण नाहीं. हें चरित्र रा. साने ह्यांनीं मुद्दाम विद्यार्थिवर्गाकरितां लिहिलें आहे. आणि विद्यार्थ्यांनीं तें वाचून त्याचें मनन करावें इतकें तें उदात्त आहे. तरी विद्यार्थ्यांनीं ह्याचें चीज केल्यास आणखी अशींच चरित्रें लिहिण्यास रा. साने ह्यांना उत्साह वाटेल. आईबापांनीं हें चरित्र आपल्या मुलांकडून अवश्य वाचवावें अशी त्यांना आग्रहाची विनंति आहे.

—धों. के. कर्वे

---

# पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर

## प्रकरण १ लें

## प्रस्तावना

बंगालमध्यें ईश्वरचंद्र यांचें नांव लहान मुलांच्या सुद्धां परिचयाचें आहे. आपल्या मुलांसमोर आईबाप ईश्वरचंद्रांचा आदर्श ठेवितात. जुन्या बाळबोध घराण्यांत, राजनिष्ठ कुटुंबांत, राष्ट्रीय वृत्ति बाळगणाऱ्या गृहस्थांच्या घरांत, सर्वत्र ईश्वरचंद्रांचा कित्ता ठेवलेला असतो. मनुष्याचें चरित्र ईश्वरचंद्रांप्रमाणें असावें, त्यांचा जीवनक्रम डोळ्यांसमोर ठेवून मुलांनीं पाउलें टाकावीं, व जगाच्या भ्रमभोंवऱ्यांत शिरावें, आणि उत्तम नांवलौकिक संपादावा, अशी आई-बापांची बंगाली बाळांस बाळपणापासून शिकवण असते. विद्यासागरांचें नांव तेथें फार घरोब्याचें आहे. आपल्याकडे 'ज्ञानोबा, तुकाराम' ज्याप्रमाणें प्रत्येक लहानथोरांस माहीत आहेत, त्याप्रमाणेंच बंगालमध्यें ईश्वरचद्रांसंबंधीं आहे.

ईश्वरचंद्र म्हणजे अत्यंत आज्ञाधारक, आईबापांस देवाप्रमाणें मानणारा एक सत्पुरुष, अत्यंत उद्योगी, विपन्नावस्थेंतून, कष्टदशेंतून, स्वपराक्रमानें यशोवैभव-संपन्न होणारा, अशा स्वरूपांत त्यांची पुष्कळांस ओळख असते. ईश्वरचंद्र म्हणजे दयेचा सागर ही पण जाणीव सर्वांस असते. परंतु या गुणसमुच्चया-बरोबर ईश्वरचंद्र हे सिंहासारखे शूर, अनंत संकटांशीं टकरा देणारे वीर, सतत चिकाटीनें ध्येयार्थ सज्ज असणारे नरसिंह, सुखास न लालचावलेले, स्वाभिमान-सूर्य सदैव तळपत ठेवणारे, सत्त्वासाठीं सर्वस्वावर तिलांजली वाहावयास यत्किंचितही मागेंपुढें न पाहणारे, एक निर्भय पुरुषव्याघ्र होते हें मात्र पुष्कळांस माहीत नाहीं. पुष्कळ आईबाप ईश्वरचंद्रांच्या जीवनांतील ही गोष्ट आपल्या मुलांच्या मनावर बिंबवीत नाहींत. दुसऱ्याचें दुःख पाहून ढळढळां रडणारे विद्यासागर, जर कोणीं त्यांचा व इतरांचा स्वाभिमान, स्वत्व हिरावून घेण्याचा प्रयत्न केला तर हेच विद्यासागर मेरुपर्वताप्रमाणें धीरवृत्तीनें लढण्यास सिद्ध असत; राजा असो राजराजेश्वर असो, त्यांस त्यांची तमा नसे. स्वाभिमान-शून्य नरांचें जीवित म्हणजे आंधळें, निःसत्त्व पशूचें जीवन होय. पशूसुद्धां स्वत्वासाठीं धडपडतात. सर्पाच्या फणेवर दर्पानें कोणीं लगुडप्रहार केला, तर

तो सरपटणारा सर्प फूत्कार करितो; अंगावर धावून येतो. विद्यासागरास अपमान सहन होत नसे. ते मानधन होते. या मृदुकठोरत्वामुळें त्यांच्या जीवनास विशेष शोभा आली आहे. ते फुलासारखे कोमल आहेत; तर वज्राप्रमाणें कठोरही आहेत. विद्यासागर हे खरोखर विद्येचे–ज्ञानाचे सागर होते. ते मोठे समाज-सुधारक होते. समाजामध्यें महत्पद प्राप्त करून त्यांनीं घेतलें होतें. त्यांच्या साह्याची प्रत्येक सामाजिक चळवळींत विशेष जरूर असे. बंगालच्या मुख्य सत्ताधीशापासून तो रस्त्यांत रखडणाऱ्या भिकाऱ्यापर्यंत त्यांची सर्वांस सारखीच जरूर भासत असे. प्रत्येक जण त्यांची स्तुति करी, त्यांची पूजा करी. त्यांचें शारीरिक सामर्थ्यही फार मोठें होतें. तिघांचौघां गलेलठ्ठ धटिंगणांबरोबर ते एकटे झगडूं शकत. मनुष्यानें जसें असावें तसे ते होते. ते निर्मळ होते, ते सत्यनिष्ठ होते. एका विनोदी बंगाली माणसानें एकदां सहज उद्‍गार काढले, 'परमेश्वर पुष्कळ बंगाली निर्माण करीत होता; इतक्यांत मध्येंच त्यानें ईश्वरचंद्र हा पुरुष चुकून निर्माण केला.'– याचा अर्थ म्हणजे भित्र्या, भ्याड, बंगालीबाबूंत पुरुषपदवीस पात्र ईश्वरचंद्र होते. ते पुरुष होते हेंच त्यांचें यथार्थ वर्णन. त्यांच्यांत पौरुष होतें. पौरुषाशिवाय पुरुष कसचा? ते पुरुष होते. ते मर्द होते. हें पौरुष, हा मर्दानीपणा, हा स्वाभिमान वाचकांनीं विद्यासागरांच्या चरित्रापासून घ्यावा एतदर्थ हें खालील छोटें चरित्र आम्हीं लिहिण्याचें योजिलें आहे.

---

## प्रकरण २ रें

## पूर्वजांची व वडिलांची हकीकत–जन्म व बालपण

विद्यासागरांचा जन्म पश्चिम बंगालमध्यें हुगळी जिल्ह्यांतीलः वीरसिंह या गांवीं झाला. विद्यासागरांच्या आजोबांचा स्वभाव कांहींसा तऱ्हेवाईक होता. ते शरीरानें प्रतिभीम होते. फार शूर व हट्टी. त्यांस अपमान अल्पही सहन व्हावयाचा नाहीं; अगदीं क्षुल्लक गोष्टीनेंही ते संतापावयाचे; रागानें लाल व्हावयाचे. प्रतिजमदग्नीच ते! मस्तकाच्या शिरा ताडताड उडूं लागावयाच्या; डोळे खदिरांगारासारखे लाल व्हावयाचे; सर्व शरीर क्रोधानें केवळ कंपायमान

व्हावें. परंतु शरीराचे ठिकाणीं आविर्भूत होणारा क्रोध प्रत्यक्ष कृतींत रूपांतर पावत नसे. ज्या व्यक्तीवर ते संतापत, त्या व्यक्तीस कोणत्याही प्रकारें ते उपसर्ग देत नसत, हेंही खरें. म्हणजे त्यांचें मन खरें पाहिलें तर नवनीतसमच होतें, हें निःसंशय होय. एकदां फार विरक्त होऊन ते घरांतून बाहेर पडले. नाना तीर्थें त्यांनीं केलीं, सर्व यात्रा केल्या; परंतु आयुष्याचा सायंसमयींचा पडदा पडण्याच्या वेळीं, विद्यासागरांचे आजोबा आपल्या मुलाबाळांच्या गोकुळांत आले आणि ते घरींच देह ठेवते झाले.

विद्यासागरांची आई एका पंडिताची कन्या होती. विद्यासागरांच्या आईचे वडील त्या वेळीं सर्व बंगालमध्यें एक नांवाजलेले वैय्याकरणी होते. विद्यासागरांची आई ही हिंदु आर्यस्त्रीचा केवळ आदर्श होती. आपल्या मुलाच्या जीवनक्रमावर तिच्या वर्तनाची विलक्षण छाप पडली हें खरें. दयासागर ही पदवी विद्यासागरांस मिळावयास त्यांच्या मातेचें परोपकारित्वच कारण आहे. तिची भूतदया अभूतपूर्व होती. ती केवळ माउली होती. ईश्वरचंद्रांची आपल्या आईवर किती श्रद्धा, भक्ति, निष्ठा होती हें सांगितलें तर सध्याच्या दिवसांत त्यावर कोणाचा विश्वास सुद्धां बसणार नाहीं.

ईश्वरचंद्रांच्या वडिलांचें नांव ठाकुरदास वंद्योपाध्याय. दारिद्र्याच्या गारठ्यांत हे कसे तरी कुडकुडत वाढले. त्यांचें शिक्षण अर्थातच बेताचें झालें. आपल्या कुटुंबांतील विपन्नावस्था पाहून त्यांचें करुण मन वितळलें. त्या वेळेस ते १५ वर्षांचे सरासरी झाले असतील. परंतु ठाकुरदास केवढ्या धीराचे! आपले सोन्यासारखे धाकटे भाऊ, आपली कृश माता यांना सुख देतां येईल तर पाहावें या विचारानें ठाकुरदास आपल्या घरादारास सोडून कलकत्त्यास आले. या वेळीं त्यांचे लहरी वडील दूर यात्रा करीत कोठें तरी भटकत होते.

ठाकुरदास हे उद्योगाचे भगीरथ; स्वभाव प्रामाणिक. या दोन अमोलिक गुणांच्या जोरावर अनेक अडचणींतूनही त्यांनीं महिना दोन रुपये वेतनाची नोकरी मिळविली. परंतु ही दोन रुपयांची भली मोठी नोकरी मिळण्यापूर्वी त्यांस किती कष्टाचे दिवस कंठावे लागले! पुष्कळ दिवस त्यांस एकदांच खाऊन राहावें लागे. एका दयाळू सद्‌गृहस्थानें एकदां त्यांस आचारी म्हणून ठेवलें. परंतु ठाकुरदासांचा हा दयाळू यजमानच कांहीं कारणामुळें अत्यंत गरिबींत आला; तेव्हां ते उभयतां मोठ्या मिनतवारीनें दिवस लोटीत होते.

एक दिवस ठाकुरदासांच्या पोटांत अन्नाचें एक शितसुद्धां गेलें नाहीं. भुकेनें पंचप्राण कंठांत गोळा झाले. क्षुधेचें भीषण दुःख विसरावें या हेतूनें ठाकुरदास घराच्या बाहेर पडले. लाह्या विकणाऱ्या एका बाईच्या दुकाना-समोर दमून गेलेला, निर्जीव झालेला, गलितगात्र झालेला ठाकुरदास उभा राहिला. बाईनें ओळखलें कीं, हा ब्राह्मण भुकेला आहे. "ठाकूर, आपणांस कांहीं पाहिजे का ?" असें तिनें गोड व सहानुभूतिपूर्वक स्वरानें विचारलें. 'एक पेलाभर पाणी द्या' असें ठाकुरदास म्हणाले. ब्राह्मणांस नुसतें पाणी कसें द्यावें असा बाईस विचार पडला; म्हणून तिनें कांहीं लाह्या ब्राम्हणास दिल्या व वर एक पेलाभर पाणी दिलें. त्या लाह्या ठाकुरदासानें एखाद्या दुष्काळांत सांपडलेल्या बुभुक्षिताप्रमाणें तेव्हांच मटकावल्या. तेव्हां बाईनें ब्राह्मणास विचारलें, 'ठाकूर, तुम्ही जेवलां नाहीं वाटतें ?' न बोलतां संमति-पूर्वक उत्तर ठाकुरदासानें दिलें. ती बाई पुत्रवत्सल होती. तिचें अंतःकरण द्रवलें. ती कळवळली. ती एका गवळ्याच्या घरीं गेली आणि कांहीं दहीं घेऊन परत आली. नंतर लाह्या आणि दहीं तिनें त्यास पोटभर खावयास दिलें. नंतर ती त्यास म्हणाली, "कधीं तुला जेवणखाण मिळालें नाहीं, ज्या दिवशीं तुला उपाशी राहण्याची पाळी येईल, त्या दिवशीं तूं तत्काळ मजकडे येत जा आणि आपली क्षुधाशांति करीत जा." त्या मुलापासून तिनें होकारार्थी वचन घेतलें.

विद्यासागर आपल्या वडिलांच्या आयुष्यांतील ही मोठी करुणपूर्ण कहाणी ज्या ज्या वेळेस आपल्या मित्रांस सांगत त्या वेळेस त्यांच्या डोळ्यांत अश्रु-बिंदु चमकल्याशिवाय रहात नसत. अशा प्रकारच्या बारीक सारीक गोष्टी पाहून एकंदर स्त्रीजातीसंबंधीं त्यांचें हृदय कृतज्ञतेनें व प्रेमानें भरून येई. आणि त्या प्रेमामुळेंच या स्त्रीजातीच्या समुन्नतीसाठीं त्यांनीं अनेक संकटें सुखानें सहन केलीं.

ठाकुरदास यांस महिना दोन रुपये मिळत. परंतु निरनिराळ्या उपायांनीं तो आपले पैसे सांठवी व ते घरीं पांच पुत्रांसह गुजराण करणाऱ्या आपल्या आईकडे पाठवून देई. मुलाकडून ही प्रेमाची व कष्टाची मदत अल्प का होईना जर आली तर त्या माउलीच्या पोटांत भडभडून येई व तिचें अंतः-करण किती तरी गहिंवरे.

पुढें कांहीं दिवसांनीं ठाकुरदास यांची भगवच्चरणदास नांवाच्या श्रीमंत

गृहस्थाजवळ गांठ पडली. भगवच्चरण यांची व ठाकुरदासाचे वडील यांची पूर्वीची ओळख होती. ठाकुरदास यांची सचोटी, सततोद्योग, चिकाटी हीं पाहून भगवच्चरण संतुष्ट झाले व त्यांनीं ठाकुरदास यांस आपल्या घरीं येऊन रहाण्यास व आपल्या बरोबर भोजन करीत जाण्यास सांगितलें. या वेळेपासून विद्यासागरांच्या घरांत सुख आणि समाधान नांदूं लागलीं. गृहसौख्य मिळूं लागलें. काळजीकथा दूर होऊं लागली.

ठाकुरदास यांचा पगार आतां पांच रुपये झाला होता. त्या वेळेस देशांत सर्वत्र स्वस्ताई असे. दोन चार रुपयांत मोठ्या कुटुंबाचें पोषण करितां येत असे. माझ्या गांवचे एक गृहस्थ खानदेशांत मराठी शाळेंत मास्तर होते. त्यांचा जास्तींत जास्त पगार वाढला तो ६॥ रुपये होता. आमचे लहानपणीं ते गांवांत पेन्शनर म्हणून असत व त्यांस ३। रुपये पेन्शन मिळे. त्यास ६ मुलगे होते व या मोठ्या कुटुंबाचें पोषण ते त्या पगारांत करूं शकत. त्यावेळेस धान्यादि माल परदेशीं जात नसे. देशांत माल रहात असे. दुष्काळ पडला तरी सुद्धां गांवांत राखीव कोठारें, केणीं असत व त्यामुळें कठिण काळ फारसा येत नसे. तेव्हां पांच रुपयांत ठाकुरदास हे आनंदानें घरसंसार कसे करीत याचें आपणांस आश्चर्य वाटावयास नको.

## जन्म व बालपण

आतां ठाकुरदास यांनीं विवाह केला. त्यांची बायको एका नाणावलेल्या विद्वानाची सुशील कन्या होती. या सुशील दंपत्यापासून ईश्वरचंद्रांचा इ. स. १८२० सालीं जन्म झाला. मातृपक्षाकडून ईश्वरचंद्र यांस विद्या, शील यांची जोड मिळाली, तर पितृपक्षाकडून निरपेक्ष स्वाधीनता, संकटास तोंड देण्याची हिम्मत या गोष्टी लाभल्या. कितीहि संकटें आलीं तरी दुसऱ्यासमोर मान वांकवावयाची नाहीं हा पितामहाचा गुण, कष्ट करण्याचा पित्याचा गुण, विद्वत्ता व बुद्धिमत्ता हा मातामहांचा गुण, तर शीलाची व सौजन्याची आईची जोड, या सर्व गुणांची ईश्वरचंद्रांस प्राप्ति झाली होती.

लहान असतां विद्यासागर खोडकर होते. देवासारखे शांत मुनी ते नव्हते. एखाद्या बाईनें आपली वस्त्रें स्वच्छ धुऊन उन्हांत वाळत घालून ठेवावींत आणि विद्यासागरानें येऊन त्यांच्यावर शेणमातीचा सडा करावा. असल्या खोड्या जरी ते करीत, तरी अभ्यासाच्या बाबतींत मात्र ते सदैव तत्पर व

सावधान असावयाचे. विद्यासागर ५ वर्षांचे झाले तेव्हां त्यांस त्यांच्या गांवांतील पाठशाळेंत घालण्यांत आलें. त्यांच्या पाठशाळेंतील ते उत्कृष्ट विद्यार्थी म्हणून नांवाजले. विद्यासागर यांची ग्रहणशक्ति, धारणाशक्ति, अलौकिक स्मरणसामर्थ्य, विलक्षण उद्योग हीं पाहून विद्यासागराचे गुरुजन प्रसन्न व्हावयाचे. 'हा बालक पुढें खात्रीनें कीर्तिमान होणार' असें आशीर्वचन व भविष्यवचन त्यांच्या मुखावाटें सहज बाहेर पडावयाचें. विद्यासागरांचे भटकणारे आजोबा आतां घरीं आलेले होते. त्यांनीं सुद्धां अशाच प्रकारचें भविष्य केलें होतें.

२॥ वर्षांमध्यें त्या पाठशाळेंतील अभ्यासक्रम, शिक्षणक्रम विद्यासागर यांनीं समाप्त केला. शिक्षकांनीं विद्यासागरांच्या वडिलांस भेटून सांगितलें, 'तुमचा मुलगा फार अलौकिक बुद्धीचा आहे. देवानें त्यांस बुद्धीचें व उद्योगाचें देणें दिलें आहे. तर यास तुम्ही। पुढील विद्याभ्यासाठीं कलकत्त्यास घेऊन जा. त्याच्या शिक्षणाची आबाळ करूं नका.' अत्यंत दारिद्र्यामुळें ठाकुरदास यांस विद्याभ्यास करावयास संधि मिळाली नाहीं. जी संधि आपणास मिळाली नाहीं, ती आपल्या मुलांबाळांस सदैव द्यावयाची हा मात्र त्यांनीं आपल्या मनाशीं निश्चय केला. मी शिकलों नाहीं तर नाहीं; परंतु माझ्या मुलांस मात्र मी शिकविणार अशी आणभाक आपल्या मनाशीं ठाकुरदास यांनीं केली.

---

## प्रकरण ३ रें

## कलकत्त्यास विद्याभ्यासार्थ प्रयाण

याच सुमारास ठाकुरदास यांचे वृद्ध वडील ७६ वे वर्षीं दिवंगत झाले. और्ध्वदेहिक कर्मे करण्यासाठीं ठाकुरदास कलकत्त्याहून घरीं आले होते. सर्व क्रिया सांग संपल्यावर ते कलकत्त्यास जावयास निघाले. या वेळेस ठाकुरदास यांनीं आठ वर्षांच्या विद्यासागरासही बरोबर घेतलें. कलकत्त्यास नेऊन मुलाच्या शिक्षणाची कांहीं सोय लावतां येते का, हें ते पहाणार होते. त्या वेळेस आगगाड्या वगैरे नव्हत्या. गाडीरस्त्यानें कलकत्त्यास जावें लागे. 'बाबा, तो

रस्त्याच्या बाजूला कसला मोठा दगड आहे हो?' असें विद्यासागरांनीं विचारलें. "अरे, तो मैलाचा दगड आहे. मोठ्या सडकांवर अंतर दाखविणारे असे दगड बसविलेले असतात. त्या दगडावर येथून कलकत्त्याचें अंतर दर्शविलें आहे. प्रत्येक मैलमैलावर असे दगड असतात, आणि त्यांच्यावर हें अंतर जसजसें कमीजास्त होईल तसें लिहिलेलें असतें" असें ठाकुरदासांनीं उत्तर दिलें. हे आंकडे इंग्रजी होते. त्यामुळें विद्यासागरांस ते समजतना. 'तो आंकडा किती आहे हो बाबा?' विद्यासागर यांनीं कुतूहलपूर्ण प्रश्न विचारला. '१९' असें बाबांनीं उत्तर दिलें. १९ म्हणजे एकावर नऊ हें विद्यासागरानें ओळखलें आणि पहिला आंकडा एकाचा व दुसरा नवाचा असला पाहिजे असा त्यांनीं आपल्या मनाशीं विचार केला! 'बाबा, पहिला आंकडा म्हणजे इंग्रजी एकाचा आंकडा, व दुसरा नवाचा, असें असावें नाहीं? असें विद्यासागर म्हणाले. 'होय' एवढेंच मोजकें बोलणारे त्यांचे वडील म्हणाले. अशा प्रकारचीं प्रश्नोत्तरें झाल्यावर ते निमूटपणें रस्त्यानें चालले होते. रस्त्यांतील सर्व मैलांचे दगड विद्यासागर नीट न्याहाळून पहात व त्यांत असलेला नवीन आंकडा शिकत. कारण पाठीमागच्या आंकड्यावरून हा आकडा कोणता हें त्यांस कळे; व असें कळून आल्यावर त्यांतील इंग्रजी आंकडे कसे आहेत, कोणती आकृति कोणता अंक दाखविते हें सर्व लक्षपूर्वक ते शिकले. एकएक मैल कमी होत आला; कारण अंतर कमी होऊं लागलें. १९, १८, १७ असे मैलांचे दगड गेले. आतां मैलाचा १० वा दगड आला. विद्यासागर वडिलांस म्हणाले, "बाबा, मी सर्व इंग्रजी आंकडे शिकलों; कोणताही आंकडा मला इंग्रजींत मांडावयास सांगा. मी मांडून दाखवितों." विद्यासागराचे शब्द ऐकून त्याचे वडील आश्चर्यचकित झाले. आपल्या मुलास खरोखर हे आंकडे मांडण्याचें समजलें आहे का याची त्यांनीं परीक्षा घेतली; तों ते विद्यासागर यांनीं बिनचूक लिहून दाखविले. थोड्या वेळानें आपला मुलगा हें विसरेल असें मनांत धरून ठाकुरदास यांनीं ईश्वरचंद्र याचें चित्त अन्य गोष्टीकडे वेधलें; व बराच वेळ गेल्यावर जेव्हां एक मैलाचा दगड आला तेव्हां त्याच्यावरील आंकडा मुलास विचारला. विद्यासागर यांनीं बरोबर उत्तर दिलें. बापास आनंदाचें भरतें आलें. ते मुलास थोपटून म्हणाले, "शाबास बाळ, तूं पूर्णपणें इंग्रजी आंकडे शिकलास, अशी माझी खात्री झाली आहे." अशा प्रकारच्या गोष्टी जरी फार अलौकिक व अपूर्व नसल्या, तरी खेडेगांवांतील एका मुलानें, जो

शहरांतील मुलाप्रमाणें जरा चौकस व अनेक गोष्टी पाहणारा नसतो,' त्यानें लक्षपूर्वक ही गोष्ट केली, याचें आम्हांस तरी फार कौतुक वाटतें.

पितापुत्र आतां कलकत्त्यास आले. दुसऱ्या दिवशीं ठाकुरदास आपल्या कामांत दंग झाले. ते निरनिराळीं 'बिलें' नंबरवार लावीत होते. जवळ विद्यासागर बसले होते. आपले वडील काम करीत आहेत हें तो लक्षपूर्वक पहात होता. ठाकुरदास यांचे हल्लींचे नवीन मालकही (त्यांचें नांव जगद्दुर्लभ असें होतें) तेथें त्यांस मदत करीत होते. या बिलांचें वडील काय करितात, हें सर्व आतां ईश्वरचंद्रांच्या ध्यानांत आलें; व 'हें काम मलाही करतां येईल' असें तो आपल्या वडिलांस म्हणाला. जगद्दुर्लभांस मुलाची इच्छा पाहून विस्मय वाटला. "तुला इंग्रजी आंकडे समजतात का?" असा प्रश्न विचारला. 'होय' असें विद्यासागरानें उत्तर दिलें. रस्त्यावर येतांना घडलेली सर्व हकीकत ठाकुरदास यांनीं आपल्या धन्यास निवेदन केली. आपल्या मुलाचा मोठेपणा दुसऱ्यांना सांगतांना आईबापांस किती धन्य वाटत असतें! 'तर मग हीं बिलें लाव पाहूं बाळ' असें जगद्दुर्लभांनीं विद्यासागर यांस सांगितलें. विद्यासागर यांनीं आपलें काम चोख बजाविलें हें पाहून 'हिंदुमहाविद्यालयांत तुम्हीं तुमच्या या मुलास इंग्रजी शिक्षण, कांहीं करा, पण द्याच' असें त्रयस्थ मंडळीनें ठाकुरदास यांस परोपरीनें सांगितलें. 'ठाकुरदाससारख्या गरीब गृहस्थास या उच्च शिक्षणाचा खर्च झेपेल कसा' अशी शंका एकानें प्रदर्शित केली. "तुम्ही मला ओळखीत नाहीं, मला जे १० रुपये हल्लीं मिळतात, त्यांतील पांच रुपये माझ्या मुलाच्या शिक्षणार्थ मी खर्च करीन; आणि उरलेल्या पांच रुपयांतच आपल्या कुटुंबाचें कसें तरी मला भागविलें पाहिजे" असें ठाकुरदास म्हणाले. विद्यासागरांच्या वडिलांचे हे धीरोदात्त उद्गार ऐकून प्रत्येक जणास सानंद विस्मय वाटला.

जरी प्रत्येकजण विद्यासागर यांस इंग्रजी शिकविण्यास सांगत होता, तरी ठाकुरदास यांच्या मनांत निराळीच गोष्ट होती. आपल्या मातामहाप्रमाणें व इतर कांहीं संबंधी लोकांप्रमाणें विद्यासागरानें संस्कृत पंडित व्हावें, आपल्या खेड्यांत एक संस्कृत पाठशाळा चालवावी, आणि तेथें लायक व योग्य विद्यार्थ्यांस मोफत शिक्षण द्यावें अशी ठाकुरदास यांस इच्छा होती.

परंतु तात्पुरतें ईश्वरचंद्र यांस जवळ असलेल्या एका प्राथमिक शाळेंत त्यांनीं पाठविलें. तीन महिन्यांतच ईश्वरचंद्र यानें त्या शाळेंतील शिक्षण संपविलें.

परंतु याच सुमारास विद्यासागर फार आजारी पडला. कलकत्त्याचे अनेक उपचार त्यास खडखडीत बरे करूं शकले नाहींत. त्यांची आजी खेड्यांतून कलकत्त्यास आली व आपला नातू बरोबर घेऊन ती खेड्यांत गेली.

स्थानत्यागानें विद्यासागर यास लवकरच बरें वाटूं लागलें. हवापाणी, घरचें खाणें, खेळगडी, यामुळें लवकरच विद्यासागर नीट खणखणीत झाले. एका पंधरवड्यानेंच ठाकुरदास हे पुनरपि आपल्या पुत्रास घेऊन कलकत्त्यास गेले. आतां त्यास संस्कृत महाविद्यालयांत घालण्यांत आलें. मुलास बरोबर घेऊन त्यास ठाकुरदास विद्यालयाचे द्वारापाशीं नेऊन पोचवावयाचे. असा कित्येक दिवस क्रम चालला होता. मुलास दुसऱ्या मुलांची वाईट संगति न लागावी म्हणून ठाकुरदास ही अशी खबरदारी घेत असत. पुष्कळ मुलें कुमार्गास लागून आपल्या आयुष्याचें मातेरें करून घेतात. उत्कट बुद्धि, कणखर शरीर, पैसा, या तिन्ही गोष्टी सन्निध असूनही व्यसनशतानें घेरले जाऊन निराशेच्या अंधकारांत त्यास खितपत पडावें लागतें. आपल्या मुला-संबंधींच्या आई-बापांच्या महत्त्वाकांक्षा, त्यांच्या उड्या, त्याच्या मनांतील सुखाचे सोन्याचे दिवस पाहाण्याचीं स्वप्नें, या सर्वांवर पाणी पडतें. उज्ज्वल भविष्यकाळ दुःखमय होतो. असें होऊं नयें म्हणून ठाकूरदास फार जपत. आपला मुलगा निष्कलंक, निर्मळ, धुतल्या तांदळाप्रमाणें रहावा यास ठाकूर-दास फार जपत. विद्यावैभवापेक्षां शीलास प्राधान्य आहे हें ते जाणून होते. It is true that knowledge is power but character is power is truer still ' हें त्यांच्या डोळ्यासमोर असे. आणि म्हणून ते मुलाच्या बाबतीत फार काळजी घेत.

खेडेगांवांतील शाळेप्रमाणें येथेंही विद्यासागर सर्व वर्गबंधूंत पहिले येण्याचा सदैव प्रयत्न करीत व त्यास त्यांच्या प्रयत्नामुळें व बुद्धिसामर्थ्यामुळें यश पण मिळत असें. आपल्यापेक्षां आपल्या बरोबरीचा, ज्ञानानें, विद्वत्तेनें, उद्योग-शीलतेनें वरचढ आहे असें त्यांनीं जर पाहिलें तर त्यांस चैन पडावयाचें नाहीं. आपण कमी कां ? त्यांच्यासारखे आपणही प्रयत्न केल्यास होऊं असें त्यांस वाटे व ते जास्त प्रयत्न करावयाचे. यांत द्वेष, किंवा असूया नव्हती तर आपल्या प्रयत्नांतील शैथिल्याचा त्यांस तिटकारा येई. आपला उणेपणा नाहींसा करण्यासाठीं, दुसऱ्याच्या मांडीशीं मांडी लावून बसतां यावें यासाठीं ते दिवस रात्र मग पाहावयाचे नाहींत; सारखा उद्योग अखंड चालावयाचा.

अशा दीर्घ व सतत प्रयत्नांनी काय प्राप्त होणार नाहीं? उद्योगरतास पृथ्वी ही कामधेनु आहे. तरुणपणांतच नव्हे, तर वयातीत झाल्यावर सुद्धां ईश्वरचंद्रांची ही ज्ञानलालसा अशीच तरतरीत होती. जो जो विषय आपणास माहीत आहे, त्या त्या विषयांत नवीन ज्ञान नेहमीं संपादन करण्यासाठीं ते समुत्सुक असायाचे. वृद्धावस्थेंतही तरुणांस लाजविणारी त्यांची ही ज्ञानपिपासा पाहिली म्हणजे आम्हीं लज्जेनें माना खालीं घालाव्या असेंच प्रांजलपणें बुद्धीस वाटतें. मोठेपणींची विद्यासागर यांची एक गोष्ट सांगतात कीं, एकदां एक सुशिक्षित गृहस्थ विद्यासागरांजवळ फ्रेंच तत्त्वज्ञ कॉम्टे याच्या तत्त्वज्ञानासंबंधीं चर्चा करीत होते. चर्चा संपल्यावर विद्यासागर उठून गेले. तेव्हां तो गृहस्थ जवळ बसलेल्या आपल्या मित्रास म्हणाला, 'केवढ्या गाढ्या पंडिताजवळ आज माझी गांठ पडली.' "My Lord what a giant did I meet today!" आणि सर्वांत आश्चर्य म्हणजे हें कीं, कॉम्टे यांचें तत्त्वज्ञान नुकतेंच कोठें इंग्रजी भाषेंतून प्रसिद्ध होण्यास सुरवात झाली होती. आणि इंग्रजी भाषेचीं मुळाक्षरें शिकण्यास तर विद्यासागरांनीं जवळजवळ पंचविशीनंतर आरंभ केला; परंतु या कठीण परकी भाषेवरील त्यांचें प्रभुत्व, त्यांचें प्राविण्य म्हणजे पुष्कळ इंग्रज लोकांस एक कोडें असे. हें सर्व कोडें, उद्योग, श्रमसातत्य, दृढ ज्ञानलालसा, दुर्दमनीय हेतु, यांच्या योगें स्पष्ट होतें.

---

## प्रकरण ४ थें

## संस्कृत महाविद्यालयांत प्रवेश व तेथील अभ्यास

संस्कृत महाविद्यालयांत वयाचे ९ वे वर्षीं ईश्वरचंद्र यांचें नांव दाखल करण्यांत आलें. या संस्कृत महाविद्यालयांतील सर्व प्रकारचा शिक्षणक्रम त्यांनीं २१ वे वर्षीं पुरा केला. प्रत्येक शास्त्रांत त्यांनीं पांडित्य संपादन केलें. प्रत्येक शास्त्रांत ते पारंगत म्हणून समजले गेले.—'आपण कधींही असा बुद्धिमान् विद्यार्थी पाहिला नाहीं' असे उद्गार त्यांच्या सर्व शिक्षकांनीं सदैव काढावे. संस्कृत व्याकरण म्हणजे किती कष्टाचें व घोटाळ्याचें! परंतु ११ वे वर्षीं हें शास्त्र त्यांनीं संपविलें. नंतर त्यांनीं साहित्याकडे नजर फेंकली. इतका

लहान वयाचा मुलगा माझ्या वर्गांत नको असें साहित्याचार्यांनीं सांगितलें. सुंदर व दुर्बोध असें संस्कृत साहित्य यास काय समजणार ? मर्कटासमोर मोतीं दाखविण्याप्रमाणें तें आहे वगैरे ते म्हणाले. परंतु ईश्वरचंद्र यानें थोडेच गप्प बसणार ! 'मी संस्कृत महाविद्यालयच सोडून चाललों; नाहीं तर मला त्या वर्गांत बसण्यास परवानगी द्या' असा विद्यासागरानें हट्ट धरिला. 'माझी वाटेल तर परीक्षा घ्या. त्या परीक्षेंत उत्तीर्ण झालों तरच मला तुमच्या वर्गांत बसण्यास परवानगी द्या; नाहीं तर देऊं नका' असें स्वाभिमानपूर्वक त्यांनीं गुरूंस सांगितलें. विद्यासागरांची ही सूचना मान्य करण्यांत आली. कुमार-संभव व भट्टिकाव्य यांतील गहन व दुर्बोध श्लोकांचा अन्वयार्थ त्यांस विचारण्यांत आला. विचारलेल्या प्रश्नांचीं त्यांनीं अत्यंत समाधानकारक अशीं उत्तरें दिलीं. परवानगी न देणारे आचार्य आश्चर्यमूढ झाले व त्यांनीं मोठ्या आनंदानें विद्यासागरांस आपल्या वर्गांत दाखल करून घेतलें. १४ वर्षांचे होतात न होतात तोंच त्यांनीं साहित्यभाग संपाविला. प्रत्येक वेळेस ते पहिले आले. प्रत्येक प्रश्नपत्रिकेंतही ते पहिले. रघुवंश, कुमारसंभव, राघव-पाडवीय, भारवी व माघ यांचीं महाकाव्यें, मेघदूत, शाकुंतल, विक्रमोर्वशीयम्, उत्तररामचरित्र वगैरे सर्व प्रमुख साहित्यग्रंथ त्यांनीं आत्मसात् केले. संस्कृत-मध्यें ते आतां उत्कृष्ट कविताही लिहीत, व त्या वाचून सर्वांस आनंद वाटत असे. मायभाषेप्रमाणें ते आतां संस्कृत भाषेंतही अस्खलित भाषण करीत व कोणाही पंडिताबरोबर या गीर्वाण भाषेंत वाग्युद्ध करण्यास ते बद्धपरिकर असत. हें वाग्वैभव त्यांच्या वर्गबंधूंस थक्क करी एवढेंच नव्हे तर त्यांचे गुरु-जनही विस्मयानें तोंडांत बोटें घालीत. सतत परिश्रमानें व अभ्यासानें त्यांनीं आपली स्मरणशक्ति इतकी वृद्धिंगत केली, कीं एकदां एकादी गोष्ट वाचली किंवा त्यांनीं श्रवण केली कीं ताबडतोब ती विद्यासागर आपलीशी करीत आणि तोंडपाठ म्हणून दाखवीत.

विद्यासागर यांस शिष्यवृत्ति मिळत असे. आपल्या मनांतील आकांक्षा पूर्ण करण्यास आपला पुत्र योग्य आहे हें दिसून येतांच, ठाकुरदास यांनीं ईश्वर-चंद्राच्या त्या शिष्यवृत्तींतून आपल्या मूळग्रामीं कांहीं जमीन खरेदी करण्याचें ठरविलें; कारण तेथें आपल्या मुलानें पाठशाळा उघडून ज्ञानसत्र घालावें अशी त्यांची महनीय इच्छा होती. त्या पाठशाळेंत योग्य विद्यार्थ्यांना मोफत राहावयास व जेवावयास मिळावें अशी सोय व्हावी अशी ठाकुरदास यांची

इच्छा होती. बंगालमध्यें अशा पुष्कळ पाठशाळा होत्या कीं, ज्या पाठशाळांत विद्यार्थ्यांस मोफत शिक्षण, मोफत भोजन व मोफत निवासस्थान दिलें जाई. माझे एक मित्र आहेत ते सांगतात कीं, त्यांच्या आजोबांच्या वेळीं त्यांच्याकडे जवळ जवळ १५ विद्यार्थी शिक्षण घेण्यास होते व ते त्यांच्याबरोबरच जेवणखाण सर्व कांहीं करीत. घरांतील मुलांप्रमाणें या विद्यार्थ्यांची काळजी घेण्यांत येत असे व गृहपति त्यांस शिक्षण देत असे. अशीच पाठशाळा आपल्या पुत्रानें चालवावी ही या ठाकुरदासमहाशयांची इच्छा होती. ईश्वरचंद्रानें पित्याच्या म्हणण्यास आनंदानें रुकार दिला. खरोखरच वीरसिंह येथें कांहीं जमीन खरेदी करण्यांत आली. परंतु ही भावी योजना शेवटीं सफळ झाली नाहीं. कारण खेडेगांवांत फक्त पाठशाळा चालविण्याचें या पंडितप्रवराच्या भालप्रदेशीं लिहिलेलें नव्हतें. त्याच्या ललाटरेषेंत यापेक्षा मोठ्या गोष्टी लिहिलेल्या होत्या. मोठ्या वातावरणांत त्यांस वावरावयाचें होतें. बंगालच्या जीवनांत हालचाल त्यांस निर्माण करावयाची होती. समाजसुधारणा, शिक्षणसुधारणा, वाङ्मय-सुधारणा त्यांस करावयाच्या होत्या. यामुळें पित्याची ही साधी इच्छा पुढें बाजूस राहिली. व्याकरण व संस्कृतवाङ्मय संपविल्यावर वयाच्या पंधराव्या वर्षीं ईश्वर अलंकार-वर्गांत दाखल झाला. एका वर्षांतच साहित्यदर्पण, काव्य-प्रकाश, रसगंगाधर व इतर साहित्यशास्त्रावरील ग्रंथ त्यांनीं आलोचिले. वार्षिक परीक्षेंत नेहमींप्रमाणें ते पहिले आले.

त्या काळीं युरोपियन न्यायाधीशांस मदत करण्यासाठीं म्हणून इतर पंडित व काजी सरकारकडून निवडले जात. हिंदुधर्मशास्त्रांतील सर्व गोष्टींचा ज्यानें सूक्ष्म अभ्यास केला असेल असा गृहस्थ हिंदु-कायद्यासंबंधीं वरील युरोपियन न्यायाधीशांस साहाय्य करण्यासाठीं, सर्व मुद्दे विशद करण्याठीं नेमला जाई. बहुत-करून संस्कृत महाविद्यालयांतूनच सदरहू गृहस्थाची योजना होत असे. यासाठीं धर्मशास्त्राची मुद्दाम परीक्षा घेण्यांत येई. व्याकरण, वाङ्मय, साहित्यशास्त्र, न्याय, वेदांत या शास्त्रांत जो उत्तीर्ण झाला असेल त्यासच या धर्मशास्त्रांतील परीक्षेस बसण्याचा परवाना मिळे. अन्यत्रांस तेथें मज्जाव होता. परंतु ईश्वरचंद्रांस मुद्दाम परवानगी मिळाली. ते अद्याप न्याय व वेदांत या परीक्षांत उत्तीर्ण झाले नव्हते. तरी सुद्धां अलौकिक बुद्धिमत्ता असल्यामुळें त्यांस या परीक्षेस बसण्यास परवानगी मिळाली. या परीक्षेंत ईश्वरचंद्रांस नेहमींप्रमाणें पहिल्या दर्जाचें यश लाभणार नाहीं अशी पुष्कळांची अटकळ होती. ही परीक्षा फार

कठीण असे आणि अगदीं थोडे विद्यार्थी तींत यशस्वी होत. परंतु ईश्वरचंद्र परीक्षेच्या काठिण्यानें डगमगणारे नव्हते. कठिण गोष्टही साध्य करून घेण्यांत खरें पौरुष व कसोटी आहे हें ते जाणून होते. मनुसंहिता, मिताक्षरी, दायभाग वगैरे सर्व धर्मशास्त्रांवरील अधियुक्त ग्रंथांचें त्यांनीं मार्मिक परिशीलन केलें. आणि त्यांच्या प्रयत्नाचें फळ परमेश्वरानें त्यांस दिलें. या दिव्यांतून दिव्य यशानें ईश्वरचंद्र उत्तीर्ण झाले. परीक्षकांनीं त्यांचा गौरव केला. ही दुःसाध्य परीक्षा या १७ वर्षांच्या मुलानें कशी दिली याचें पुष्कळांस राहून राहून आश्चर्य वाटलें. या वेळेसच त्यांस सरकार न्यायाधीशपंडित ही जागा देत होतें, परंतु ठाकुरदास यानीं ईश्वरचंद्रास संमति दिली नाहीं. अद्याप लहान असल्यामुळें आपल्या मुलानें आपल्यापासून दूर जाऊं नये असें पित्यास वाटे. यासाठीं विद्यासागर यांनीं सरकारी निमंत्रण स्वीकारिलें नाहीं.

१९ वे वर्षी वेदांताचा अभ्यास करण्यास विद्यासागर यांनीं आरंभ केला. नेहमींची वार्षिक परीक्षेची वेळ आली. इतर प्रश्नपत्रिका लिहून झाल्या. आज निबंधलेखनाची परीक्षा होती. परंतु परीक्षामंडपांत ईश्वरचंद्र दिसत नव्हते. “आजच्या परीक्षेस ईश्वर कां बरें हजर नाहीं ? तो आजारी आहे का ?” वगैरे गुरुजन पृच्छा करूं लागले. चौकशी करतां करतां महाविद्यालयाच्या ओट्यावर ईश्वर कांहीं तरी लिहीत बसलेला त्याच्या शिक्षकांस दिसला. परीक्षेच्या ठिकाणीं त्यास बळेंच ओढून नेण्यांत आलें. ‘मला उत्तम संस्कृत लिहितां यावयाचें नाहीं, मग उगीच मी कशास येऊं ?’ असें ईश्वरचंद्र म्हणत होते. ‘वेडा कुठला ! चल लवकर, आणि प्रश्नपत्रिका लिहावयास लाग. तुझ्यापेक्षां मला तुझी जास्त परीक्षा आहे’ असें गुरुजींनीं जरा रागानें व प्रेमानें सांगितल्या-वर विद्यासागर लिहावयास बसले. विद्यासागर विनयाचे आगर होते. त्यांस आत्मविश्वास नव्हता. त्यांचा निबंध सर्वोत्कृष्ट ठरला. त्यांच्या निबंधाची भाषा प्रौढ व सुंदर होती. तर्कपद्धति निर्दोष व समर्पक होती. त्यांस या निबंधाबद्दल शंभर रुपयांचें पारितोषिक देण्यांत आलें. यानंतर काव्यरचनेची चढाओढ लावण्यांत आली. त्यांतही ईश्वरचंद्र यांचें काव्य उत्तम ठरलें व त्यांस शंभर रुपयांचें दुसरें परितोषिक मिळालें. वेदान्ताचा अभ्यास झाल्यावर त्यांनीं सर्व षट्शास्त्रांचा—षड्दर्शनांचा अभ्यास करण्यास आरंभ केला. वार्षिक परीक्षेंत सर्व विद्यार्थ्यांत ते पहिले आले व या वर्षीहि कवितेबद्दल त्यांस १०० रुपयांचें बक्षीस मिळालें. या वर्षी त्यांस तात्पुरतें व्याकरण विषयाचें अध्यापन

दोन महिनेपर्यंत देण्यांत आलें. हा मिळालेला पगार त्यांनीं आपल्या वडिलांस यात्रा करण्यासाठीं दिला. ज्या वडिलांनीं पोटास चिमटा घेऊन, स्वतः उपासमार करून आपणांस शिकविलें, विद्यादान दिलें, सुसंस्कृत होण्यास संधि दिली, त्या परमपूज्य पित्यास कृतज्ञतेनें हे ८० रुपये देतांना विद्यासागर यांस किती धन्यता वाटली असेल! आणि दोन रुपये वेतनावरही संतुष्ट राहणाऱ्या ठाकुरदासांस हे आपल्या मुलानें यात्रेसाठीं दिलेले ८० रुपये पाहून किती कृतार्थता वाटली असेल, हें आम्ही शब्दानें कसें सांगणार? आपल्या हातानें झाड लावलें; सर्व किड्या-मुंग्यापासून त्याचें रक्षण केलें. गुरांनीं खाऊं नये म्हणून त्यास कसें जपलें; आणि त्या झाडानें रसाळ फळें आज दिलीं हें मनांत आणून त्या माळ्यास किती आनंद होतो. तद्वतच आपल्या मुलाचें वृद्धिंगत होणारें यश पाहून ठाकुरदास यांस वाटलें असेल. धन्य तो पिता आणि धन्य तो सुपुत्र, कीं जे आपआपलीं कर्तव्यें अशा उत्तम रीतीनें पार पाडून जगास कित्ता घालून देतात. कर्तव्यविन्मुख होणाऱ्या लोकांच्या डोळ्यांत अंजन घालणारे असे पुरुष पूज्य होत यांत संशय नाहीं. पित्यानें हे पैसे घेऊन मोठ्या आनंदानें यात्रा केल्या व ते परत घरीं आले.

ईश्वरचंद्र यांनीं आतां संकृत विद्यालयांतील शेवटची परीक्षा दिली. आजपर्यंतच्या सर्व परीक्षांचे निकालांप्रमाणें या वेळेचाही निकाल होता. संकृत महाविद्यालयाचें प्रमुख आचार्य जयनारायण तर्कपंचानन हे म्हणाले, "अशा अलौकिक बुद्धीचा विद्यार्थी या महाविद्यालयांत कधींहि आला नव्हता; ईश्वरचंद्र हे या संस्थेस भूषण आहेत." ईश्वरचंद्र यांस २५० रुपयांचें पारितोषिक मिळालें व 'विद्यासागर' ही यथार्थ 'पदवी' त्यांस मिळाली. ही पदवी खरोखर किती अनुरूप होती! व्याकरण, अलंकार, साहित्य, तर्क, षड्दर्शनें, ज्योतिष, सामुद्रिक, धर्मशास्त्र या सर्व विषयांच्या अध्यापकांनीं सही केलेलें प्रशस्तिपत्र ईश्वरचंद्र यांस देण्यांत आलें. संस्कृत महाविद्यालयांतील ईश्वरचंद्रांचा अभ्यासक्रम समाप्त झाला.

---

## प्रकरण ५ वें

# सरकारी नोकरी

अभ्यासक्रम समाप्त झाल्यावर ईश्वरचंद्र यांस फोर्ट वुल्यम महाविद्यालयांत नोकरी मिळाली. या महाविद्यालयाचे प्रमुख मार्शल नांवाचे सद्गृहस्थ होते. हे पूर्वीं संस्कृत महाविद्यालयाचेही प्रमुख होते. विद्यासागर अभ्यासक्रम संपल्यावर आपल्या मूळगांवीं वीरसिंह येथें राहावयास गेले होते. या रिकाम्या असलेल्या जागेबद्दल त्यांच्या वडिलांनीं त्यांस कळविलें त्या वेळेस जे सिव्हिलियन सनदी नोकर कंपनीकडून नेमिले जात त्यांची परीक्षा या फोर्ट वुल्यम महाविद्यालयांतील शिक्षकांकडून घेतली जाई. ईश्वरचंद्र यांची नेमणूक केल्यावर प्रमुख मार्शल हे विद्यासागर यांस म्हणाले, या सिव्हिलियन लोकांची परीक्षा फार कडक घेऊं नका. जरा बेतानेंच घ्या.' विद्यासागरांस अशा गोष्टी माहीत नव्हत्या. वशिल्याचें तट्टें त्यांस माहीत नव्हतें अशा प्रकारें वागणें त्यांचें ब्रीदच नव्हतें. त्यांनीं मार्शल यांस सडेतोड उत्तर दिलें, ' महाशय, माझ्या हातून असें कर्म घडणें कठीण आहे. अगदीं अल्पही अन्याय करण्यापेक्षां, मी येथून निघून जाण्यासही तयार आहें.' परंतु हें प्रकरण फार विकोपास गेलें नाहीं. विद्यासागर आतां इंग्रजी व हिंदी शिकवावयास लागले. त्यांनीं दोन शिक्षक ठेविले. एका शिक्षकास दरमहा १५ रुपये व दुसऱ्यास १० रु. ते देत असत. त्यांना महिना ५० रुपयेच मिळत. त्यांतील २५ रुपये वरप्रमाणें जात. उरलेल्या २५ पैकीं २० रुपये ते घरीं आईस पाठवीत. त्यांनीं वडिलांस ' नोकरी सोडून द्या व आतां आपण घरीं सुखानें राहा ', असें सांगावें. कलकत्त्यास उरलेल्या पांच रुपयांतच ते आपला निर्वाह करीत. ते स्वयंपाक करीत व सर्व काम स्वहस्तानेंच करावयाचें.

या वेळेस लॉर्ड हार्डिंज गव्हर्नर जनरल होते. हे फोर्ट वुल्यम कॉलेज पाहण्यासाठीं आपल्या अमदानींत एकदां आले होते. ईश्वरचंद्रांचें व हार्डिंज यांचें बराच वेळ बोलणें वगैरे झालें. शिक्षणासंबंधीं कांहीं थोडीफार चर्चा पण झाली.

न्यायाधीश पंडितांची जागा आतां रद्द करण्यांत आली होती. १८४६ मध्यें बंगाल प्रांतांत १४० प्राथमिक शिक्षणाच्या नवीन शाळा स्थापन करण्यांत

आल्या. या शाळांची देखरेख सर्व विद्यासागर यांच्याकडे होती. नवीन नेमणुका वगैरे करणें त्यांचेकडेच होतें. या वेळेस संस्कृत महाविद्यालयांत आचार्यांची जागा रिकामी होती. या जागेवर ईश्वरचंद्र यांस नेमावें अशी डॉ. मॉयट यांची प्रबल इच्छा होती. या जागेचा पगार ९० रुपये होता. विद्यासागर यांनीं या बढतीच्या जागेवर स्वतः जाण्याचें नाकारलें; परंतु "या जागेसाठीं मी एक लायक माणूस निवडून देतों" असें मात्र त्यांनीं आश्वासन दिलें. कलकत्त्यापासून फार दूर राहणाऱ्या तारानाथ तर्कवाचस्पति नांवाच्या पंडितांस विद्यासागर यांनीं ही जागा देवविली. ६० मैल अंतरावर असलेल्या वाचस्पतींच्या घरीं ते स्वतः पायीं गेले व त्यांस आग्रह करून घेऊन आले!

संस्कृत महाविद्यालयांत दुसऱ्या वर्षांच्या विद्यार्थ्यांस शिकविण्यासाठीं कांहीं शिक्षक नेमावयाचे होते. उमेदवार तर पुष्कळ होते. ईश्वरचंद्र यांनीं सुचविलें कीं, या सर्व उमेदवारांची चढाओढीची परीक्षा घ्यावी. या परीक्षेंत ईश्वरचंद्र यांचे दोन मित्र वर आले व त्यांस दोन जागा मिळाल्या.

या वेळेस विद्यासागर यांची अलौकिक मातृभक्ति दर्शविणारी एक गोष्ट घडून आली. विद्यासागर यांच्या तिसऱ्या भावाचें घरीं विवाहकार्य व्हावयाचें होतें. 'तूं कसेंही करून लग्नाला येच' असें आईचें आमंत्रण आलें होतें. विद्यासागर हे मार्शल यांस रजा विचारावयास गेले. मार्शल रजा देत ना. काय करावें हें विद्यासागर यांस सुचेना. आईनें तर उद्यां बोलाविलें आहे; साहेब तर हट्ट धरून बसले आहेत. परंतु शेवटीं मातृप्रेमाचा आणि मातृ-निष्ठेचा विजय झाला. ईश्वरचंद्र यांनीं नोकरीवर लाथ मारली. राजीनामा लिहून साहेब-मजकुराकडे त्यांनीं पाठवून दिला; आणि ईश्वरचंद्र निघाले. वाटेंत अपरंपार मुसळधार पाऊस कोसळूं लागला. मेघ गडगडत होते; विजा लखलखत होत्या, दिशा धुंद झाल्या होत्या; परंतु हा मातृनिष्ठ वीर मोठ्या ढोंपर ढोंपर पाण्यांतून रस्त्यांतून जात होता. येतां येतां ते दामोदर नदीजवळ येऊन थडकले, तों ती नदी केवळ बेफाम होऊन दुथडी भरून चाललेली. दामोदर नदी आधींच जरा भयंकर, त्यांत मोठा पूर आलेला. सायंकाळची वेळ होऊन काळोख पडावयास लागलेला. नदींत फेरीवाले होडी लोटण्यास तयार होत ना. आपले पंचप्राण कोण संकटांत घालणार? पुष्कळ पैसे देण्याचें विद्यासागर यांनीं कबूल केलें; परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं ईश्वरचंद्र यांनीं मनाशीं धडा केला. आईनें घरीं बोलाविलें आहे आणि आज रात्रीं घरीं

तर पोंचलेंच पाहिजे अशी आईची आज्ञा आहे. आईची आज्ञा पालन करण्यांत प्राण संकटांत पडले तरी फिकीर नाहीं असें मनांत आणून त्यांनीं नीट कमर कसली. विद्यासागर हे सामर्थ्यानें दांडगे होते. त्यांची शरीरयष्टि पीळदार, लोखंडासारखी कणखर होती. ते पोहणारे तर पहिल्या प्रतीचे पटाईत. 'माताजी की जय' अशी आरोळी ठोकून दामोदर नदीच्या बेफाम प्रवाहांत बेदरकार त्यांनीं उडी ठोकिली. पाण्याच्या प्रवाहाशीं दोन हात करीत मातृभक्त विद्यासागर परतीरास सुखरूप पोंचले. आतां घर थोड्याच अंतरावर राहिलें होतें. नदीपलीकडे त्यांचें गांव होतें. ईश्वरचंद्र आतां पळत सुटले, ते घरीं येऊन आईसमोर दाखल झाले. दारावर त्यांनीं टिचकी मारली. 'कोण आहे' असा प्रश्न आला. 'मी ईश्वर' असें उत्तर दिलें गेलें. आईनें एकदम दरवाजा उघडला व ईश्वरचंद्र आंत गेले. ईश्वरचंद्र यांचे ओले कपडे पाहून सर्वांनीं चौकशी केली. त्यांची हकीगत ऐकून सर्वांनीं परमेश्वराचे आभार मानले. 'माझा मुलगा आल्याशिवाय राहणार नाहीं, हें तर मी सारखें म्हणत होतें. यांचाच माझ्यावर विश्वास नव्हता व हीं सर्व जणें माझी थट्टा करीत होतीं. परंतु माझा ईश्वर मला माहीत आहे. इतरांस तो तसा माहीत असणें शक्यच नाहीं' वगैरे त्यांच्या आईनें स्वतःची व आपल्या मुलाची स्तुति करून घेतली.

ईश्वरचंद्र परत कलकत्त्यास आले. एका सिव्हिलियन गृहस्थानें 'माझें नांव संस्कृत काव्यांत गोंवून जो उत्कृष्ट काव्य करील त्यास २०० रुपये बक्षीस देण्यांत येतील' असें जाहीर केलें. ईश्वरचंद्र यांनीं हें बक्षीस मिळविलें. ईश्वरचंद्र यांनीं ही रक्कम स्वतःसाठीं घेतली नाहीं. हे २०० रुपये संस्कृत महाविद्यालयास त्यांनीं दिले; व चार वर्षेपर्यंत उत्तम संस्कृत कविता करणाऱ्या विद्यार्थ्यांस त्यांतून ५० रुपयांचें बक्षीस द्यावें असें ठरविण्यांत आलें. १८४६ मध्यें ईश्वरचंद्र यांनीं संस्कृत महाविद्यालयाच्या असिस्टंट सेक्रेटरीची जागा स्वीकारली. **फोर्टवुइल्यम** कॉलेजमधील त्यांची पंडितांची जागा दीनबंधु यांनीं घेतली. या संस्कृत महाविद्यालयांत त्यांस पुष्कळ सुधारणा करावयाच्या होत्या. डॉ. मोयेट त्यांच्यावर खुष झाले. वाङ्मय घेणाऱ्या विद्यार्थ्यांस गणित त्यांनीं आवश्यक केलें.

या सुमारास साहित्याचार्यांची महाविद्यालयांत जागा रिकामी होती. जरी या जागेचा पगार जास्त होता तरी ती विद्यासागर यांनीं स्वीकारली नाहीं;

कारण पैशापेक्षां अंतर्गत सुधारणा करण्याकडे त्यांचें लक्ष वेधून राहिलें होतें. ही जागा स्वीकारून त्यांस सुधारणा करतां येणें शक्य नव्हतें. विद्यासागर यांनीं पसंत केलेल्या एका गृहस्थाकडे ही जागा गेली. विद्यासागर यांचा धाकटा भाऊ हरचंद्र या वेळीं मरण पावला. त्यामुळें पुष्कळ दिवस विद्यासागर यांस कांहीं सुचत नसे. एकटे बसले म्हणजे मोठमोठ्यानें ते ओक्साबोक्शीं रडत.

हळूहळू विद्यासागर यांचें मन दुःखावेग विसरूं लागलें. परंतु आतां मुख्य सेक्रेटरी व दुय्यम सेक्रेटरी यांच्यामध्यें अंतर्गत सुधारणांसंबंधीं वरचेवर मत-विरोध दिसून येऊं लागले. शेवटीं विद्यासागर यांनीं राजीनामा दिला. कॉलेज-चे प्रमुख व सेक्रेटरी उभयतांनीं विद्यासागर यांस सोडून जाऊं नका असें परोपरीनें सांगून पाहिलें. परंतु आपणांस ज्या गोष्टी न्याय्य, रास्त व योग्य वाटतात, त्याप्रमाणें वागतां येत नाहीं, तेथें राहणें म्हणजे माणुसकीचें मरण होय असें ईश्वरचंद्रांस वाटे. स्वाभिमान व स्वतंत्रवृत्ति हीं तर त्यांचीं जीवित-तत्त्वें; तीं अनेक पिढ्यांपासून त्यांच्या रोमरोमांत आलेलीं. पाळण्यांत त्यांच्या-बरोबर वाढलेलीं. अर्थातच विद्यासागर यांनीं राजीनामा दिला; परंतु त्याचा परिणाम काय होईल याचा त्यांनीं विचार केला नाहीं. स्वाभिमानी गृहस्थांस मरण पत्करतें पण अपमान पत्करत नाहीं; मग मागें पुढें परिस्थिति भेडसावीत असली तरी त्याची तादृश फिकीर त्यांस वाटत नाहीं. विद्यासागर यांच्या कुटुंबांत जवळ जवळ लहान-थोर मिळून ३० मंडळी होती. एवढ्या मोठ्या कुटुंबाचें पालनपोषण करणें म्हणजे काय नको? सारें ब्रह्मांड पाहिजे. पाठच्या भावास जो पगार मिळत होता, तेवढ्यावरच त्यांस कसें बसें सर्वांचें संगोपन करणें प्राप्त होतें. शिवाय घरीं वडिलांकडे त्यांस तेथील खर्चासाठीं दरमहा ५० रुपये कर्ज काढून पाठवावे लागत ते निराळेच. विद्यासागर हे डॉ. मोयेट यांनीं विनंती केल्यावरून श्री. बँक नांवाच्या एका गृहस्थांस संस्कृत, हिंदी, व बंगाली शिकवीत असत. हा अभ्यासक्रम संपल्यावर त्या गृहस्थानें ३०० रुपये विद्यासागरांपुढें केले. परंतु पैशामुळें जिकिरीस आलेल्या विद्या-सागरांनीं या पैशास स्पर्श केला का? छे, ते म्हणाले 'डॉ. मोयेट माझे मित्र आहेत; त्यांच्यासाठीं मीं जी गोष्ट केली, तिचा मोबदला कसा घेऊं?' धीरो-दात्त पुरुष, सत्त्वशील पुरुष, संकटपर्वत कोसळला तरी स्वपथापासून परावृत्त होत नाहीं हेंच खरें; दुसरें काय आम्ही म्हणणार?

१८४९ पर्यंत विद्यासागर यांस कोठें अन्य नोकरी मिळाली नाहीं. आतां

फोर्ट वुल्यम महाविद्यालयांत 'लेखकाची जागा' रिकामी झाली होती. ही मुख्य लेखकाची जागा घेण्याबद्दल प्रिन्सिपाल मार्शल यांनीं विद्यासागर यांस किती तरी आग्रह केला. शेवटीं मोठ्या मिनतवारीनें ईश्वरचंद्रांनीं ही ८० रुपयांची जागा पतकरिली. ही जागा पत्करून फार दिवस झाले नाहींत तोंच संस्कृत विद्यालयांत पुनः साहित्याचार्यांची जागा रिकामी झाली. विद्यासागर यांनीं आपल्याकडे नोकरीस यावें म्हणून संस्कृत महाविद्यालयाच्या चालकांनीं जंग जंग पछाडलें. शेवटीं १८५० त विद्यासागर यांनीं एकदाची ही जागा स्वीकारली. परंतु ही जागा स्वीकारतांना त्यांनीं एक अट घातली होती. ती अशी कीं 'पुढें-मागें लवकरच आपल्यास संस्कृत विद्यालयाचे प्रमुखांची जागा मिळावी.' त्या वेळेस "महाविद्यालयाची सद्यःस्थिति व ती सुधारण्याचे उपाय" यासंबंधीं विद्यासागर यांस एक अहवाल लिहिण्यास सांगण्यांत आलें. श्रमाचे सागर ईश्वरचंद्र अहवाल लिहावयास लागले व लवकरच तो पूर्ण करून शिक्षणचालकांकडे तो पाठवून देण्यांत आला. या अहवालांतील साद्यंत, साधार व सोपपत्तिक विवेचनानें शिक्षण-चालक खूष झाले; व त्यांनीं प्रिन्सिपालची जागा विद्यासागर यांस मोठ्या सन्मानपुरस्सर दिली. त्यांस आतां २५० रुपये पगार झाला होता.

संस्कृत महाविद्यालयांतील प्रत्येक खात्यांत त्यांस कांहींना कांहीं सुधारणा करावयाच्या होत्या. जुन्या हस्तलिखित संस्कृत ग्रंथांचें त्यांनीं प्रकाशन केलें; आणि तत्त्वज्ञानावरील ग्रंथांचें पुनर्मुद्रण केलें. महाविद्यालयांत त्यांनीं शिस्त लाविली. वेळच्या वेळेवर सर्व शिक्षकांनीं अभ्यासक्रम सुरू करावे, यांतही त्यांनीं जरा कडक धोरण स्वीकारिलें. जयनारायण तर्कपंचानन हे सुद्धां मोठ्या युक्तीनें त्यांनीं नियमबद्ध केले. हे जयनारायण रोज शाळेंत उशीरां यावयाचे. विद्यासागरांचे हे गुरु, म्हणून विद्यासागरांस त्यांस स्पष्टपणें 'लवकर या,' असें सांगतां येईना. तेव्हां जयनारायण यावयाची वेळ झाली म्हणजे विद्यासागर दरवाज्यांत उभे राहात व त्यांस नमस्कार करून विचारीत 'आतांच का आलेत?' ते कांहीं उत्तर देत नसत. असें कांहीं दिवस चाललें. एक दिवस जयनारायण फार चिडले; ते म्हणाले, 'मला रोज आतांच का आलेत म्हणून काय विचारतोस? आतांच कां आलेत म्हणून कां नाहीं विचारीत, म्हणजे मला उत्तर तरी देतां येईल, किंवा दुसरें कांहीं करतां येईल." विद्यासागर म्हणाले, "मी असें

आपणांस कसें विचारणार ? " दुसऱ्या दिवसापासून जयनारायण नियमित-पणें येऊं लागले !

संस्कृत विद्यादेवीच्या मंदिराचे दरवाजे त्यांनीं सर्व जातींच्या· सर्व वर्णांच्या लोकांस खुले केले. यामुळें बंगालमधील सर्व पंडितवर्ग खवळला. अब्रह्मण्यं, अब्रह्मण्यं, असें हे पंडित बोलूं लागले. परंतु कितीही जोराचा विरोध रूढींचे गुलामांकडून आला, तरी डगमगणारे विद्यासागर नव्हते; जें योग्य व युक्त दिसेल, जें न्याय्य व रास्त वाटेल तें करावयाचें, हा तर विद्यासागरांचा बाणा. विद्यासागर यांनीं या पंडितप्रवरांना त्यांच्याच डोळ्यांत अंजन घालून गप्प बसविलें. युरोपीयांस संस्कृत शिकवून, त्यांच्यापासून मात्र पैसे घेण्यास तुम्हांस कांहीं दिक्कत वाटत नाहीं ना ? युरोपीय हे ब्राह्मणच असतील ! का प्रभुसत्ता व मत्ता त्यांच्याजवळ आहे म्हणून ते जास्त पवित्र झाले ? संस्कृतीनें भिन्न, धर्मानें भिन्न,आचारानें तर फारच भिन्न, अशा पाश्चात्यांस संस्कृत शिकविण्यांत कांहीं गैर व अशुचि नाहीं; तर मग संस्कृति, धर्म, आचारविचार. परंपरा यांनीं तुमच्याशीं संलग्न असे जे तुमच्या भूमींतील, हजारों वर्षें तुमच्या शेजारीं राहणारे, त्यांस तेंच ज्ञान देतांना तुम्ही आरडाओरड अकाण्डतांडव करावें हें ठीक आहे का ? " विद्यासागरांच्या या मार्मिक प्रश्नानें सर्व ब्रह्मवृंद थंड झाला. त्यांचा राग मनींच्या मनीं जिरला.

या वेळेस त्यांनीं इंग्रजी शिक्षण घेतलेल्या लोकांस संस्कृत शिकण्यास सोपें व्हावें म्हणून उपक्रमणिका हा ग्रंथ लिहिला. हा व्याकरणाचा ग्रंथ आहे. नंतर तीन प्राथमिक संस्कृत पुस्तकें त्यांनीं तयार केलीं. अशा रीतीनें संस्कृताच्या अध्यायनास नवीन सुशिक्षित लोकांस त्यांनीं प्रोत्साहन दिलें.

उन्हाळ्यांत फार त्रास होतो म्हणून १॥–२ महिने सुटी असावी असा विद्यासागर यांनीं विचार केला. शिक्षण–चालकांस विनंति करून ही सुटी त्यांनीं मंजूर करून घेतली. हल्लीं जी उन्हाळयाची सुट्टी मिळते ती ईश्वरचंद्रांच्या प्रयत्नांचें व योजनेचें फळ आहे.

विद्यासागर यांचा कीर्तिपरिमल दशदिशांत दरवळूं लागला. ते थोरा-मोठ्यांचे, जमीनदारांचे, अधिकाऱ्यांचे, दोस्त झाले. लॉर्ड हार्डिंज, डलहौसी, कॅनिंग वगैरे सर्वाधिकारी त्यांच्याजवळ स्नेहाच्या व सन्मानाच्या नात्यानें वागत.

शिक्षणचालकांनीं संस्कृत महाविद्यालयांत आमूलाग्र सुधारणा काय कराव्या वगैरेबद्दल विद्यासागर यांस दुसरा एक अहवाल लिहावयास विनंति केली. त्यांचा अहवाल फार सुंदर होता व मुद्देसूद होता. विद्यासागरांचे विचार वाचून अधिकारी संतुष्ट झाले व विद्यासागर यांस बढती मिळाली. त्यांस आतां दरमहा ३०० रुपये मिळूं लागले. विद्यासागर यांनीं ज्या कांहीं शिक्षणार्थ सूचना केल्या होत्या, त्यांत सर्वांत महत्त्वाच्या दोन होत्या. बंगालभर ठिकठिकाणीं शाळा उघडाव्या; आणि शिक्षकांस शिक्षण देण्यासाठीं शिक्षामहाविद्यालयें स्थापावीं.

ईश्वरचंद्र यांस जादा २०० रुपये पगारावर कांहीं जिल्ह्यांतील शाळांची देखरेख व तपासणी करण्याचा अधिकार १८५५ मध्यें देण्यांत आला. कलकत्त्यांत एक शिक्षकांस शिक्षण देणारें विद्यालय स्थापन झालें. या विद्यालयाचे पहिले मुख्य शिक्षक अक्षयदत्त हे होते. अक्षयदत्त हे त्या वेळचे नामांकित गद्यलेखक होते. त्यांनीं अनेक विषयांवर उपयुक्त निबंध लिहिले आहेत. वाङ्मय, काव्य, इतिहासशास्त्र– कशांतही त्यांची बुद्धि अप्रतिहत चाले. ही चळवळ चालू असतां विद्यासागरांचे अत्यंत मोठे स्नेही 'बेथूनसाहेब' हे मरण पावले. विद्यासागर यांस परमावधीचें दुःख झालें. परंतु दुःखांतच चूर होणारे ते नव्हते. पुनः कांहीं काळानें ते रीतसर कार्यांत मग्न होऊन राहिले.

या वेळेस डॉ. मोयेट हे मोठ्या रजेवर इंग्लंडांत गेले. त्या वेळेस बंगालचे जे सूत्राधिकारी होते, त्यांचें नांव हॅल्डे असें होतें. हॅल्डे यांनीं शिक्षणाच्या बाबतींत कांहीं फार मोठे फरक केले. डायरेक्टर ऑफ पब्लिक् इन्स्ट्रक्शन ही एक नवीनच जागा त्यांनीं निर्माण केली. या जागेवर यंग नांवाचा एक अगदीं अननुभवी तरुण मनुष्य हॅल्डे यांनीं नेमला. विद्यासागर यांस ही गोष्ट रुचली नाहीं. ते लेफ्टनंट गव्हर्नर यांस म्हणाले, 'या जागेवर कोणी तरी अनुभवी शिक्षणाग्रणी नेमावा. कारण ही जागा फार जबाबदारीची आहे, लेफ्टनंट गव्हर्नर म्हणाले, 'यंग हे कांहीं सर्वसत्ताधीश नाहींत. प्रत्यक्ष मी त्यांच्या कामावर देखरेख ठेवणार आहें. आणि तुम्ही पण सर्व सूचनांनीं, सल्ला वगैरे देऊन त्यांस मदत करावी.'

१८५४ मध्यें एतद्देशीयांच्या शिक्षणासाठीं म्हणून विलायतेंत असणाऱ्या डायरेक्टरांनीं कांहीं लाख रुपये मंजूर केले. या पैशांचा विनियोग करण्याचें काम त्या वर्षीं विद्यासागर यांस देण्यांत आलें होतें. विद्यासागर यांनीं अनेक

जिल्ह्यांत कांहीं शाळा स्थापन केल्या. परंतु १८५५ मध्यें अननुभवी व तरुण यंग हे अधिकारी झाले होते. त्यांनीं विद्यासागर यांच्या धोरणास हरकत घेतली. यंग यांस दुसऱ्या दोन दुग्मय युरोपियन इन्स्पेक्टरांचें सहाय्य व सल्ला हीं होतींच. १८५४ मध्यें जो ठराव झाला व ज्या ठरावाच्या अंमलबजावणी-साठीं हे पैसे विद्यासागरांच्या स्वाधीन करण्यांत आले, त्या ठरावाच्या माथि-तार्थाबद्दलच या दोघांमध्यें भांडण सुरू झालें. विद्यासागर यांस स्वतःचें करणें योग्य वाटलें व यंग याचा हुकूम न जुमानतां त्यांनीं जास्त प्राथमिक शाळा उघडण्याचा सपाटा चालू केला. यंग रागावले व त्यांनीं सर्व प्रकरण लेफ्टनंट गव्हर्नरांकडे नेलें. 'इंग्लंडमधील डायरेक्टरांच्या मनांत काय अर्थ होता हें मी विलायतेहून मागवून घेतों, तोंपर्यंत तुम्ही आपलें धोरण बंद ठेवा' असें गव्हर्नर यांनीं विद्यासागर यांस दोघांचें म्हणणें ऐकून घेतल्यावर सांगितलें. शेवटीं युरोपामधून उत्तर आलें व विद्यासागर यांनीं ठरावाचा जो अर्थ केला तोच योग्य असें डायरेक्टर यांनीं मत दिलें. अधिकारलोलुप व सत्तामत्त यंग-साहेब यामुळें हतदर्प झाले; परंतु या प्रकरणामुळें त्यांनीं विद्यासागर यांच्यावर दांत ठेवला. ज्या ज्या वेळेस विद्यासागरांचें वांकडें करण्याची वेळ आली, ती त्यांनीं वायां दवडली नाहीं. हा द्वेष व मत्सर यंग यांनीं मनांत नेहमीं जागृत व प्रज्वलित ठेविला. खुनशीपणा त्यांनीं पोटांत बाळगला.

विद्यासागर यांनीं आतां मुलींच्या शाळा स्थापन करण्यास सुरवात केली. लेफ्टनंट गव्हर्नर यांनीं तोंडीं परवानगी विद्यासागरांस दिली होती. परंतु आतां इंग्लंडमधील प्रधानमंडळांत फरक झाला. यामुळें हिंदुस्थानांतील शिक्ष-णाचें धोरणही बदलणें प्राप्त झालें. विद्यासागर यांनीं ज्या कन्याशाळा ठिक-ठिकाणीं स्थापिल्या होत्या, त्या शाळांच्या खर्चास लागणाऱ्या पैशास यंग यांनीं आतां मंजुरी देण्याचें नाकारलें. विद्यासागर यांस अडचणींत आणून त्यांचा उपमर्द व अपमान करण्यास ही योग्य संधि सांपडली असें जाणून ते मनांत भेसूर व सैतानी संतोष मानिते झाले. विद्यासागर यांस स्वतःच्या पदरच्या पैशानें सर्व खर्च भागवावा लागला.

१८५७ सालीं तें प्रचंड बंड झालें. शाळेंत जावयासही मुलांस व विद्यार्थ्यांस भीति वाटूं लागली. शिवाय संस्कृत महाविद्यालयाच्या आवारांतील कांहीं जागा शिपायांस देण्यासाठीं जादा फर्मान सोडण्यांत आलें. ज्या महाविद्यालयाच्या आवारांत आडदांड व आडमुठे शिपाई राहणार, त्या ठिकाणीं शांतता कशी

राहणार ? सुरळीत व्यवहार कसा चालणार ? अध्ययन वे अध्यापन कसें पार पडणार ? या विचारानें विद्यासागर यांनीं महाविद्यालय कांहीं दिवस बंद ठेवलें. परंतु हें करतांना त्यांनीं यंग साहेबांची तोंडीं देखील किंवा उपचार-स्वरूपाची देखील परवानगी काढली नव्हती. आपल्याच अधिकारमर्यादेंत हं काम ईश्वरचंद्रांनीं केलें.

विद्यासागरांच्या या करणीनें यंगबहादूर रागानें लाल झाले. माझ्या अधिकाराचें अतिक्रमण झालें, हा माझा उपमर्द झाला. वरिष्ठांशीं ही अरेरावी झाली; याचा काय तो खुलासा करा, आपल्या कृत्याचें समर्थन करा, असें त्यांनीं विद्यासागर यांस कळविलें. विद्यासागर हे कच्च्या दिलाचे नव्हते. त्यांनीं पण सणसणीत व सडेतोड उत्तर दिलें, 'ज्या परिस्थितीमुळें मला ही गोष्ट करावी लागली, ती परिस्थिति फार निकडीची होती. त्या वेळेस ताबड-तोब व्यवस्था करणें मला प्राप्त होतें, व पत्रव्यवहार करून परवानगी मागण्यास अवसर नव्हता. मीं जें केलें त्यांत यत्किंचितही चूक व अन्याय मला तरी दिसत नाहीं.' विद्यासागर यांनीं जें उत्तर दिलें, तेंच बरोबर होतें, व त्यांनीं प्रसंगीं जें केलें तेंच युक्त असें होतें असें सर्व विचारी लोक मानतील व पुनरपि आपलीच फजिती होईल म्हणून यंग यांनीं हें प्रकरण फार लांबविलें नाहीं. ते मनांत मूग गिळून स्वस्थ बसले; परंतु यामुळें पूर्वद्वेषाग्नि जास्तच भडकला.

या वेळेस संस्कृत महाविद्यालय अजीबात बंद करावें असें घाटत होतें. परंतु विद्यासागर एखाद्या भगीरथाप्रमाणें तें चालू ठेवण्यासाठीं झगडले. हें महा-विद्यालय कां चालू ठेवावें, त्यानें काय फायदे होतील, बंद केल्यानें किती नुकसान होईल, हें सरकारास समजून सांगण्यासाठीं त्यांनीं पराकाष्ठा केली. आज संस्कृत-महाविद्यालय अजूनहि उभें आहे व तें आपलें काम करीत आहे याचें श्रेय सर्वस्वीं विद्यासागर यांस आहे.

विद्यासागर यांच्या अधिकारकक्षेंत ज्या गोष्टी येत, त्यांतहि यंग आतां ढवळाढवळ करूं लागले. अगदीं क्षुल्लक बाबतींत हे साहेब दोष दाखवूं लागले. विरोध हा आतां रोजचा होऊन बसला. पुष्कळशा मुद्यांवर रणें माजूं लागलीं. यंग साहेबानीं विद्यासागर यांस इतकें सतावलें कीं, आपण राजीनामा द्यावा असें त्यांस वाटूं लागलें. असल्या उर्मट, उन्मत्त व दुसऱ्याच्या योग्यतेची, कामाची व गुणांची पर्वा न बाळगणाऱ्या अधिकाऱ्याच्या हाताखालीं राहणें म्हणजे एक प्रकारें पदोपदीं मानहानी व मानभंग आहे हें त्यांस कळून आलें.

मान हा त्यांस जीवापेक्षां प्रिय. मानभंग होत असेल तर ते स्वर्गसुखाला लाथ मारतील व नरकांतही स्वतंत्रपणें राहण्यास राजी होतील. 'Better to reign in hell than serve in heaven.' पारतंत्र्यापेक्षां निरयगति बरी असें मोरोपंतही म्हणतात. तेव्हां हें रुपेरी बंधन तोडून टाकण्याचा त्यांनीं निश्चय केला. सुरळीतपणें कारभार करतां येणार नाहीं. लोकहिताचें काम करण्यासाठीं मी हल्लीं ५०० रुपये तनखा घेतों. या पैशाचें चीज मला करतां येणें अशक्य असेल, व कांहीं न करतां केवळ उदरंभरण म्हणून जर राहावें लागत असेल, तर याहून जास्त लज्जाप्रद गोष्ट कोणती ? असें विद्यासागर यांची सदसद्विवेकबुद्धि सांगूं लागली. ज्या वेळेस ही मनाची टोंचणी सुरू झाली, त्या वेळेस विद्यासागर यांस कांहीं सुचेना. सरकारी कृपेचा त्यांना तिटकारा; हांजी हांजी करून गोंडा घोळणें हें तर त्यांस मरण. एखाद्या जागेवर केवळ राहावयाचें म्हणून राहावयाचें अशा वृत्तीचे ते नव्हते. त्यांचा स्वाभिमान जाज्वल्य होता. ते खरे मानधन होते. ते सत्यास व सदसद्विवेकबुद्धीस हृदय-सिंहासनावर सतत स्थापून त्यांची पूजा करणारे होते. एका निमसरकारी पत्रानें यंग यांस त्यानीं आपला हेतु कळविला. तें पत्र असें होतें.

डब्ल्यू गार्डन यंग, डिरेक्टर पब्लिक इन्स्ट्रक्शन यांसः—
कलकत्ता, संस्कृत महाविद्यालयं
२९ ऑगस्ट १८५७.

मेहेरबानांस विनंती कीं:—

आपण तीन महिने कलकत्ता सोडून बाहेर दौऱ्यावर जाणार असें ऐकतों. यासाठीं तुम्हांस कांहीं गोष्टी कळविणें युक्त आहे असें समजून हें पत्र लिहीत आहें. लवकरच मी नोकरी सोडण्याच्या विचारांत आहे. राजीनामा देण्यास जीं कांहीं कारणें आहेत, तीं थोडींफार खाजगी स्वरूपाचीं असल्यामुळें, त्यांची परिस्फुटता न करणें हेंच मला बरें वाटतें.

संस्कृत महाविद्यालयांत जी नवीन व्यवस्था करावयाची आहे त्यास दोन-तीन महिने तरी लागतील. तें काम संपविण्यापूर्वी काम सोडून जाणें मला योग्य वाटत नाहीं; तेव्हां तें काम संपेपर्यंत म्हणजे येत्या डिसेंबर-अखेरपर्यंत माझ्या जागेवर मी राहणार आहें. त्या वेळेस मी माझा अर्ज रीतसर मेहेरबानांस पाठवीनच.

तुम्हांस आगाऊ ही गोष्ट माहीत असावी, आणि तुम्हांस माझ्या जागेवर कोण नेमावा याचा विचार करण्यास भरपूर अवसर मिळावा या हेतूनें मी हें लिहीत आहें; कळावें,

आपला
**ईश्वरचंद्र विद्यासागर.**

विद्यासागर यांनीं बंगालच्या लेफ्टनंट गव्हर्नरांस एक पत्र पाठविलें व त्या पत्रासोबत वरील पत्राची एक नक्कल पाठविली. तें पत्र असें,

कलकत्ता संस्कृत कॉलेज
३१ ऑगस्ट १८५७.

लेफ्टनंट गव्हर्नर एफ्. जे. हॅल्डे यांसः—

प्रिय महाशय,

कांहीं दिवसांपूर्वी शिक्षणासंबंधीं तुमचें व माझें बोलणें झालें होतें. त्या वेळेस बंगालमधील प्राथमिक शिक्षणासंबंधीं एक योजना करावयास तुम्हीं मला मोठ्या संतोषानें सांगितलें होतें. मी प्रथम जरा नाखूष होतों; परंतु पुढें मी जसजसा विचार करूं लागलों, तों तों हें काम मला फार नाजूक आहे असें दिसून आलें. कारण सद्यःस्थितींतील प्राथमिक शिक्षणाच्या व्यवस्थेचा विचार करावयाचा व तत्संबंधीं लिहावयाचें म्हणजे माझे जे सहकारी अधिकारी आहेत, त्यांच्याच कृत्यांचा परामर्ष घेण्यासारखें आहे. तेव्हां हा अहवाल न पाठविण्याबद्दल आपण उदार मनानें क्षमा कराल अशी आशा आहे. मी कबूल केलें खरें; परंतु मला सध्यां अन्य उपाय दिसत नाहीं.

डिसेंबरअखेर मी एकंदर माझ्या नोकरीपासून मुक्त होऊं इच्छितों. यंग यांसही निमसरकारी पत्रानें मीं ही गोष्ट कळवून ठेविली आहे. त्याच पत्राची एक प्रत मी सोबत जोडण्याचें धाष्टर्य करीत आहें. असो.

आपल्याबद्दल आदर व पूज्यबुद्धि बाळगणारा—
**ईश्वरचंद्र शर्मा.**

या ईश्वरचंद्रांच्या पत्रास गव्हर्नरांनीं एक अगदीं छोटें उत्तर पाठविलें.

प्रिय पंडित महाशय,

तुमचा विचार ऐकून खरोखरच फार मनापासून वाईट वाटलें. गुरुवारीं

येऊन मला भेटा; आणि हा विचार करण्याचीं कारणें खुलासेवार मला सांगा.

आ.
एफ्. जे. हॅल्डे.

या मुलाखतीचा परिणाम एवढाच झाला कीं, राजीनामा पाठविण्याचें जरा कालगतीवर पडलें. परंतु गॉर्डन यंग व विद्यासागर यांचे संबंध जास्त विरोधाचे होऊं लागले. एकंदर प्रकरण चिघळत चाललें. सामोपचारानें या गोष्टी सुधारतां येणें शक्य नाहीं असें आतां स्पष्ट दिसत होतें. गव्हर्नराच्या जरा भिडेखातर म्हणून विद्यासागर त्या जागेवर राहिले. जों जों यंगसाहेबानें त्यांस अशिष्टाचारानें वागवावें तों तों राजीनामा देण्याचा त्यांचा निश्चय बळावे. हॅल्डे हे त्यांचे मित्र, तेव्हां त्यांचेंही मन मोडवेना, अशी विद्यासागरांस मोठी पंचाईत पडली होती. शेवटीं विद्यासागर यांस यंगसाहेबांच्या अरेरावी संबंधांत राहणें अशक्य झालें. गव्हर्नर यांनीं परोपरीनें सांगून पाहिलें. परंतु विद्यासागर यांचा निश्चय बदलला नाहीं. " आतां नोकरी सोडणें हेंच माझें कर्तव्य आहे; माझा स्वाभिमान मला राहूं देत नाहीं. लोकसेवा पण मला करतां येत नाहीं. तरी मी मोठा दिलगीर आहें." असें विद्यासागर यांनीं गव्हर्नरांस कळविलें. पैशाची भीति दाखवून गव्हर्नरांनीं त्यांस परावृत्त करण्याचा प्रयत्न केला. 'तुम्ही किती तरी सामाजिक कार्यें अंगावर घेतलीं आहेत; अशा वेळीं ५०० रुपयांच्या पगाराची जागा सोडून तुम्हीं जाऊं नये; कारण तुम्हांस फार अडचणी येतील', असें गव्हर्नरानें सांगितलें. परंतु स्वाभिमान व सदसद्विवेकबुद्धि यांच्यापेक्षां पैसा विद्यासागरांस प्रिय नव्हता. आणि पैशाची अडचण दाखवून, मला गव्हर्नर ठेवूं पहातात, परावृत्त करूं पहातात, याचें त्यांस वाईट वाटलें. आणि ही अडचण असली तरीसुद्धां नोकरी सोडून देण्याचा विचार जास्तच बळावला. जें आपण करणार त्यानें आपल्या कुटुंबांतील मंडळींचें व आपलें स्वतःचें काय होईल याचा या दरिद्री ब्राह्मणानें यत्किंचितही विचार केला नाहीं; केला असला तरी त्यास प्रबळ होऊं दिला नाहीं. खऱ्या विप्राला शोभेसें त्यांनीं वर्तन केलें. खऱ्या पुरुषाला साजेसें वर्तन त्यांनीं केलें. द्रव्य माझ्यासाठीं, मनुष्यासाठीं आहे; मनुष्य द्रव्यासाठीं नाहीं, हें त्यांनीं गव्हर्नरास, आपल्या देशबांधवांस दाखवून दिलें. त्यांनीं यंग यांस एक लांबलचक पत्र लिहिलें; व आपण एकंदर या नोकरीमुळें फार त्रासलों आहोंत आणि प्रकृति

पण नादुरुस्त सबब आपण राजीनामा देतों असें त्यांनीं त्यांत लिहिलें. यंग व गव्हर्नर यांची आपसांत पुष्कळ बोलणीं झालीं. गव्हर्नर यांच्या सांगीवरून यंग यांनीं तडजोड होते का असें दाखविण्याचा वरपांगी प्रयत्न केला. परंतु यंगचें कसें अंतरंग आहे हें विद्यासागर यांस कळून चुकलें होतें. कोळसा उगाळावा तेवढा काळाच, हें त्यांस माहीत होतेंच. विषाची आणखी परीक्षा कशास पाहिजे असा मनांत विचार करून ते अढळ राहिले. गव्हर्नरचें जेव्हां जास्त सलगीचें पत्र आलें, तेव्हां मग जें उत्तर ईश्वरचंद्रांनीं पाठविलें, त्यांत त्यांनीं सर्व साद्यंत हकीगत निवेदन केली. आपणांस कशा परिस्थितींत काम करावें लागलें,आपला कसा उपमर्द होत असे,यंग आपणांवर कशी कुरघोडी करूं पाहतो, हें सर्व त्यांनीं मोठ्या हृदयविदारक तऱ्हेनें लिहिलें. परिस्थिति अशी असल्यामुळें एक मी तरी जाणें इष्ट आहे, किंवा यंग तरी दूर होणें जरूर आहे; परंतु मीच राजीनामा देतों; कारण माझी प्रकृति पण ठीक नाहीं; असें सांगून गव्हर्नरांची समजी घालण्याचा ईश्वरचंद्रांनीं प्रयत्न केला. ईश्वरचंद्र मागें घेत नाहीं असें पाहून शेवटीं गव्हर्नर यांनीं राजीनामा स्वीकारल्याचें पत्र डायरेक्टर यंग यास पाठविलें. त्या पत्रांत गव्हर्नर म्हणतात, "ईश्वरचंद्र विद्यासागर यांचा राजीनामा आम्ही स्वीकारतों. विद्यासागर यांनीं अशा तऱ्हेनें विशेष असंतोषास कारण नसतां सोडून जाणें हें खेदजनक आहे. परंतु आपण विद्यासागर यांस कळवावें कीं, त्यांनीं केलेल्या शिक्षणविषयक कामगिरीबद्दल सरकार कृतज्ञ आहे; सरकारास या गोष्टीची पूर्ण जाणीव आहे." ६ ऑक्टोबर रोजीं गव्हर्नरांनीं लिहिल्याबद्दलचें त्यांस कळविण्यांत आलें. परंतु स्त्रीशिक्षणाच्या बाबतींत विद्यासागर यांनीं जो खर्च केला, त्याबद्दलचें सरकारी बिल मंजूर होईपर्यंत शेवटला रामराम ठोकावयाचा नाहीं असें विद्यासागर यांच्या मनांत होतें. परंतु यंग यांस दम निघेना. तुमचें खर्चाचें बिल पास होईल याबद्दल निश्चित असा असें पोकळ वचन ईश्वरचंद्र यांस देण्यांत आलें. शेवटीं यंगच्या शब्दावर विश्वास ठेवून ईश्वरचंद्र या नोकरीच्या जाचांतून मुक्त झाले.

ही मोठ्या पगाराची नोकरी सोडून दिली त्या वेळेस ईश्वरचंद्र यांस एका मित्रानें हटकलें, "आपण राजीनामा देण्यांत उतावळीपणा व अविवेक दाखविला नाहीं का?" त्या वेळेस मोठ्या आवेशानें विद्यासागर त्यास बोलले, "पैसा व पदवी यापेक्षा मला स्वाभिमान प्रिय आहे. ज्या ठिकाणीं माझा स्वाभिमान संपुष्टांत येईल तेथें मी कधींही नोकरी करणें शक्य नाहीं."

वरील राजीनामा-प्रकरणावरून आपणांस एक बोध घेतां येईल. सरकारी बडे अंमलदार कितीहि आपले जिगरदोस्त झाले, त्यांस आपली विद्वत्ता, योग्यता, यथार्थपणें पटली, तरी ते आपल्या जातिबांधवाचेंच हित आधीं पाहणार. यंग या तरुण अधिकाऱ्यास अनुभव नाहीं. तादृश विद्वत्ता नाहीं. परंतु जात गोऱ्याची व जेत्याची; यामुळें ते अधिकारसंपन्न राहून विद्यासागर यांस तेथून निघावें लागलें. विद्यासागरांसारखे विद्यादेवीच्या गळ्यांतील ताईत, अनुभवी, सुधारणा करण्यांत दक्ष, शिक्षणैकरत अशा पुरुषास कोणत्याही स्वतंत्र व सुधारलेल्या देशांत शिक्षणाचीं सूत्रें देण्यांत त्या राष्ट्रांत मोठेपणा वाटला असता. असला पुरुष आपल्या शिक्षणमंत्र्याच्या पदीं असावा असें त्या राष्ट्रास वाटलें असतें. परंतु ईश्वरचंद्र या पारतंत्र्यपतित राष्ट्रांत जन्मास आले त्यांच्या गुणाचें चीज येथें कोण करणार? जनता जुन्यास चिटकणारी, कांहीं सुशिक्षित मत्सरानें ग्रासलेले, सरकारास गुणांचें गौरव करणें जसें माहितच नाहीं; अशी आमची सर्वत्र केविलवाणी दशा; आणि म्हणूनच अशा रत्नांना योग्य कर्तव्यक्षेत्र, कार्यक्षेत्र मिळणें दुरापास्त असतें.

ईश्वरचंद्र यांचा कलकत्ता विश्वविद्यालयाशीं पण संबंध होता. कॅनिंगच्या कारकीर्दीत मुंबई, मद्रास व कलकत्ता येथें विश्वविद्यालयें स्थापन झालीं. विश्वविद्यालयांत ३९ सभासद होते त्यांपैकीं फक्त सहा एतद्देशीय होते. सहापैकीं पुनः दोन मुसलमान होते. उरलेल्या चारांपैकीं विद्यासागर हे एक होते. विश्वविद्यालयीन पदवीदानसमारंभ पहिल्यानेंच झाला त्या वेळेस व्हाइसराय अध्यक्षपदीं होते. त्यांच्या एका बाजूस कलकत्याचे लॉर्ड बिशप बसले होते तर दुसऱ्या बाजूस विद्यासागर विराजमान झाले होते. विद्यासागर यांनीं विश्वविद्यालयाच्या घटनेंत कांहीं सल्ला दिला; तो मोठ्या संतोषानें स्वीकारण्यांत आला. हिंदी, बंगाली, ओरिया आणि संस्कृत या चार भाषांसाठीं ते विश्वविद्यालयांत परीक्षक नेमले गेले होते.परंतु हें काम करणारांस फार दगदग व त्रास पडे म्हणून हें काम करणारांस कांहीं जादा रक्कम मंजूर करून देण्यांत येत असे. परीक्षकमंडळाची पुनर्रचना करावयाची होती. परंतु विद्यासागर या मंडळांत येण्यास तयार होत ना. कदाचित् या कामासाठीं जो तनखा देण्यांत येई, त्या संबंधींच कांहीं भानगड उपस्थित झाली असेल; परंतु १८६५ मध्यें मात्र एम्. ए. च्या परीक्षेसाठीं ते परीक्षक होण्यास कबूल होते. विश्वविद्यालय निर्माण केल्यावर पुनरपि संस्कृत महाविद्यालय रद्द करण्याची कल्पना निघाली.

युरोपीय आणि एतद्देशीय लोकांनीं ही कल्पना उचलून धरली; विद्यासागर हे महाविद्यालयाचे मुख्य असतांना त्यांनीं ज्या सुधारणा केल्या होत्या, त्यांत सर्व विद्यार्थ्यांपासून 'फी' घेण्याचा उपक्रम त्यांनीं सुरु केला होता. तत्पूर्वीं शिक्षण सर्वांस मोफत असे. यामुळें महाविद्यालयास उत्पन्न झालें व रद्द करण्याचें कालावधीवर गेलें; नाहीं तर पूर्वींच हें रद्द झालें असतें. या वेळेस पुन्हा प्रश्न निघाल्यावर विद्यासागर एकाकी झगडले. त्यांची माहिती बिनचूक, दर्जा मोठा; एकंदरींत त्यांनीं महाविद्यालय ठेवावें याबद्दल आपली बाजू नीटपणें पुढें मांडली. विद्यासागरांच्या प्रयत्नामुळेंच हें संस्कृत महाविद्यालय आज उभें आहे. नाहीं तर तें मोडून टाकावें यासाठीं सर्वजण टपून होते. विद्यासागर यांची प्रत्यक्ष सरकारी नोकरींत असतां जी शिक्षणाविषयक कामगिरी झाली ती अशा स्वरूपाची होती.

---

## प्रकरण ६ वें

## वाङ्मयविषयक कामगिरी

हिंदुस्थानांतील इतर भाषांतील वाङ्मयाप्रमाणें बंगाली गद्य वाङ्मय हें अर्वाचीन आहे. पूर्वकाळीं विचार पुष्कळ वेळां काव्यरूपानें लिहिले जात; मग पुस्तक संस्कृत असो प्राकृत असो. बंगाली भाषेंत पहिली अभिजात गद्यरचना करणारा पुरुष म्हटला म्हणजे जगद्विख्यात राजा राममोहन राय. याबद्दल पुष्कळ वादविवाद व मतवैचित्र्य असलें तरी, आतां सर्वसामान्य मत असेंच आहे कीं, बंगाली गद्यांतही अभिनव विचार मांडतां येतात. गंभीर विषयांवरील गहन विचार बंगाली भाषेत दाखवितां येतात हें प्रथम राजानींच बंगाली जनतेस शिकविलें. राममोहनराय यांचीं पुष्कळ स्तोत्रें, परमेश्वरप्रार्थना गद्यांत असल्या तरी त्या रसाळ मनोवेधक व आनंदकारी आहेत; त्या प्रेमळ व सहज आहेत. हृदयाची निर्मळता त्यांत स्पष्टपणें दृग्गोचर होते.

राजांची भाषा साधी व सुंदर असली तरी तें सौंदर्य अगदीं सरळ होतें; त्यांत प्रौढता नव्हती; तेथें लालित्य नव्हतें. तेथें सागराचें गांभीर्य व गगनाचें गौरव नव्हतें. बंगाली वाङ्मयास लालित्यपूर्ण बंकिमनें बनविलें. बंकीमचंद्र

यांनीं बंगाली भाषा भूषविली; तिला अलंकार चढविले. असा एकही लेखन-प्रकार नव्हता कीं जो बंकिमनें आपल्या ओजस्वी भाषेंत ओतला नाहीं. स्वभावचित्रें कशीं रेखाटावीं, टीका कशी करावी, निबंध, प्रबंध कसे लिहावे, हें सर्व त्यांनीं दाखविलें. परंतु बंकिमची यक्षिणीची कांडी फिरण्यापूर्वीं आणखी एका पुरुषानें बंगालीस जीवनामृत दिलें होतें. राममोहनरायांनंतर बंगाली पंडितांच्या हातीं गेली. तेथें ती अनेक संस्कृतप्रचुर शब्दरचनेनें दुर्बोध होऊं लागली. तिचा जीव घाबरा होऊं लागला. उडूं पाहणारा पक्षी पुनः ओढला जाऊं लागला. मुक्त होणाऱ्यावर पुनः दडपण पडूं लागलें. संस्कृत भाषा बंगालीस फारच जाचूं लागली. अशा वेळीं विद्यासागर पुढें आले आणि त्यांनीं बंगाली भाषेस या वरील पंडितप्रवरांच्या करपंजरांतून मुक्त केलें. पहिलें पुस्तक जें बंगालींत विद्यासागर यांनीं लिहिलें तें वेताळपंचविशी हें होय. हा ग्रंथ गंभीर विषयावर नसला तरी त्यांतील सुंदर भाषा व भाषासरणी पाहून वाङ्मया-काशांत नवीन तारा विहार करावयास आला, आपलें तेज दाखवूं लागला असें लोक बोलूं लागले. हें पुस्तक क्रमिक पुस्तक म्हणून लावलें जावें असें विद्यासागर यांनीं शिक्षणाधिकाऱ्यांस विनविलें. रेव्ह. के. सी. बानर्जी या गृहस्थास सरकारनें या पुस्तकाबद्दल मत विचारलें. आश्चर्याची गोष्ट ही कीं, या बानर्जींनीं हें पुस्तक चांगलें आहे अशी शिफारस केली नाहीं. परंतु आज सुद्धां या पुस्तकाच्या कित्येक प्रति दरसाल खपतात, यावरून हें पुस्तक किती लोकप्रिय आहे हें दिसून येईल.

विद्यासागर निराश न होतां श्रीरामपूर येथील मिशनरी लोकांकडे गेले. या मिशनरींचे मार्शमन नांवाचे एक गृहस्थ पुढारी होते. आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या सर्व पुस्तकांत हें वेताळपंचवीशी पुस्तक उत्कृष्ट आहे असें या मार्शमन-साहेबांनीं मत दिलें. आणि या साहेबांनीं पुरस्कार केल्यानें ईश्वरचंद्र यांचें पहिलें पुस्तक जगांत जन्म पावलें. हें पुस्तक या मिशनरीच्या छापखान्यांतच छापलें. मिशनरींनीं पुरस्कार केल्यामुळें हें पुस्तक क्रमिक पुस्तक म्हणून लागलें. या पुस्तकाच्या पहिल्या आवृत्तींत पुष्कळ मोठमोठे संस्कृत शब्द, सामासिक शब्द होते. अशा **समासप्रचुररचनेनें** भाषा सुंदर न दिसतां बोजड व दुर्बोध होते असें विद्यासागर यांच्या चटकन् ध्यानांत आलें. अशा ओझ्यानें भाषा फोंफावत नाहीं हें त्यांस दिसलें. या कारणानें चतुर व व्यवहारपटु माणसा-प्रमाणें विद्यासागर यांनीं या सर्व अवजड गोष्टी आपल्या ग्रंथांतून दूर केल्या.

यानंतर विद्यासागर यांनीं अनेक विद्यालयें व महाविद्यालयें यांत उपयुक्त होतील अशीं अनेक क्रमिकपुस्तकें लिहिलीं. त्या वेळेस नवीनच शाळा, महाशाळा, स्थापन होत होत्या. अर्थातच उपयुक्त पुस्तकांची फार जरूरी होती. हीं जरूर पुरविण्यास विद्यासागर हे योग्य व विद्वान् पुरुष पुढें आले. हीं क्रमिक शालोपयोगी पुस्तकें आजही अनेक शाळांत बालगोपालांना शिक्षण देत आहेत; त्यांचीं मनें रिझवीत आहेत; आणि पुष्कळ प्रकाशकांस पैसाहि पुरवीत आहेत.

१८५५ मध्यें कालिदासाच्या जगप्रसिद्ध सुंदरतम अशा शाकुंतल नाटकाच्या आधारें त्यांनीं गद्यांत 'शकुंतला' हा ग्रंथ लिहिला. आधींच विषय मधुर व चित्तापहारी; करुणशृंगारादि रसांनीं भरलेला. विद्यासागर यांनीं हा ग्रंथ इतका सुंदर लिहिला कीं, बंगाली लोक नागाप्रमाणें डोलूं लागले. या ग्रंथानें ते वेडावले व लोभावले; आणि विद्यासागर यांची ख्याति सर्वत्र प्रसार पावली. त्या वेळचे अभिजात गद्यलेखक, गद्यलेखकमुकुटमणी असें त्यांस संबोधण्यांत येऊं लागलें. याच वर्षी पुनर्विवाहावर विद्यासागर यांनीं विद्वत्ताप्रचुर निबंध लिहिले. विद्यासागर हे जातिवंत विचारांचे प्रवर्तक आहेत हें या प्रबंधांवरून दिसतें. दुसऱ्यांचे विचार घेऊन त्यांतच पुनर्विलास करणारे ते भाषांतऱ्ये नव्हते. हे निबंध पुनरपि अशा टीकाकारांनीं वाचावे व मग आपलें शेवटचें मत देण्यास धजावें. या बाबतींत मतभेदास अल्पस्वल्प जागा असली तरी एक गोष्ट मात्र सर्वसंमत आहे. ती ही कीं, सुशिक्षित जनमनाचें आकर्षण करील, त्यांचेंही मनोरंजन व हृदयाकर्षण करील अशी भाषा प्रथम विद्यासागर यांनींच उपयोगांत आणिली. हा विद्यासागर यांच्याच विलासी लेखणीचा पराक्रम होता. तिचेंच हें वैभव होतें. विद्यासागर यांच्या लेखणीनें लोकमनास लोल बनविलें ही गोष्ट लहानसान नव्हे. अशी सुंदर बंगाली भाषा वृद्धिंगत करण्यास, तिचें स्वागत करण्यास आपण पुढें यावें असें होतकरू नवविद्वानांस वाटूं लागलें. ही या तरुणांस स्फूर्ति कोणीं दिली? ही शक्ति कोणीं निर्मिली? विद्यासागरांच्या लेखणीचा हा महिमा होता. तिला हें श्रेय आहे. बंगाली कादंबरीलेखकांचे गुरु बंकीमचंद्र लिहितात, "विद्यासागर आणि अक्षयकुमार दत्त यांनींच प्रथम संस्कृतप्रचुर बंगाली सुधारली. विद्यासागर यांनीं जी बंगाली भाषा सजविली, तीच घेऊन आम्ही पुढें जात आहोंत. ईश्वरचंद्रांनीं साहित्य गोळा केलें व आम्ही तें घेऊन मोठ्या डौलानें

मिरवीत आहोंत. त्यांनीं वस्तु जमविल्या, आम्ही बाजार करीत आहोंत."
बंकीमचंद्रांचें हें मत वाचून आपणांस विद्यासागर यांच्या कामगिरीचें महत्त्व कळून येईल. याचा अर्थ असा नव्हे कीं, त्या काळीं संस्कृतमय बंगाली अजीबात थांबली. जरी संस्कृतमय घटना दिसून येत होती, तरी बंगाली आतां दुर्बोध राहिली नव्हती. विशेषतः विद्यासागर हे फार मधुर व मनोवेधक लिहीत. त्यांच्या पूर्वीं कोणीं असें सुंदर बंगाली गद्य लिहिलें नाहीं व त्यांच्यानंतरही त्यांची धाटणी व भाषासरणी कोणास तशी साधली नाहीं असें म्हणण्यांत अतिशयोक्ति नाहीं.

अरविंद घोष यांचें नांव सर्वांस माहित असेलच. या राजकीय संन्याशाच्या मातामहांनीं–राज नारायण बोस यांनीं–विद्यासागर यांस बंगाली भाषेचे जॉन्सन असें म्हटलें आहे. जॉन्सन हे केवढे विख्यात पंडित होते हें इंग्रजी जाणणाऱ्यांस व विष्णुशास्त्री यांची निबंधमाला वाचणाऱ्यांस तरी सांगण्याची जरूर नाहीं.

१८६२ मध्यें विद्यासागर यांनीं आपलें सर्वोत्कृष्ट व सर्वसुंदर असें 'सीतार वनवास'–'सीतेचा वनवास' हें पुस्तक लिहिलें. भवभूतीच्या उत्तररामचरित्राच्या धर्तीवर यांतील पहिला अध्याय लिहिला आहे. परंतु बाकी सर्व पुस्तक विद्यासागरांच्या स्वतःच्या कल्पनेचें, विचारांचें परिणत फळ आहे. सीतेसारखी स्त्री-देवता जगाच्या वाङ्मयांत कोठेंच आढळणार नाहीं. सीतेची थोरवी कोण सांगणार ? तिची पतिनिष्ठा, तिनें सोसलेले कष्ट, दुःखानंतर थोडेंफार सुख येतें आहे तोंच पुनरपि पतीनें केलेली वनांतील पाठवणी, नंतर पृथ्वीमातेनें तिला पोटांत घेऊन केलेलें दिव्य, सर्वच कांहीं एकंदर वृत्त हृदय हेलावून सोडणारें आहे. सीतेचा स्पृहणीय दिव्य जीवनक्रम, करुणरसपूर्ण प्रसंग, आणि विद्यासागरांची रसाळ व सहजमनोहर भाषाशैली, अनुरूप विषय व तदनुरूप भाषा. विद्यासागरांचें हें पुस्तक वाचून पाषाणहृदयांस पाझर फुटेल; कठोर करुणवृत्ति होतील. कधींहि डोळ्यांतून अश्रु न आणणारे विचारवंत, संयमी व गंभीरवृत्ति लोक सुद्धां रडल्याशिवाय राहणार नाहींत. वाचतां वाचतां हृदय गहिंवरतें, गळा दाटतो व डोळे डबडबतात. आणखी अन्य पुस्तकें विद्यासागर यांनीं लिहिलीं नसतीं आणि हें एकच पुस्तक त्यांनीं लिहिलें असतें तरी सुद्धां वंगवाङ्मयांत त्यांचें नांव चिरंतन अजरामर होऊन राहतें यांत शंका नाहीं.

ज्या वेळेस ग्रंथामध्यें ग्रंथकाराचें हृदय ओतलें जातें, वर्ण्य विषयाशीं ग्रंथकाराची वृत्ति तदाकार होते, त्या वेळेसच उत्कृष्ट ग्रंथ निर्माण होतो. कोणत्याही उत्कृष्ट गोष्टीचें असेंच आहे. उत्कृष्ट काव्य, उत्कृष्ट चित्र, उत्कृष्ट अभिनय, उत्कृष्ट गान, तेव्हांच विनिर्मिलें जातें कीं, ज्या वेळेस त्या त्या कलाविदांचें त्या त्या कलांगाशीं एकरूपत्व होतें. ईश्वरचंद्रांच्या अंतरंगाचें प्रतिबिंब या पुस्तकादर्शांत पडलें आहे. ईश्वरचंद्रांचें अंतर्मन येथें मूर्तिमंत बनलें आहे; निराकार हृदय येथें साकार झालें आहे. सुप्रसिद्ध राष्ट्रीय कवि मायकेल मधुसूदन दत्त यांनीं ईश्वरचंद्रांस 'कारुण्यसागर' ही पदवी दिली होती. ते कारुण्यरसाचे सागर विद्यासागर या ग्रंथांत पाहावयास सांपडतात. असे सदयहृदय ग्रंथकारच अशीं ग्रंथरत्नें निर्माण करतील, तें अन्यांचें काम नव्हें. ज्यांच्या मनोवृत्ती कृत्रिम आहेत, ज्यांच्यामध्यें जिवंत दयेचा झरा नाहीं, ज्यांचें हृदय उदारवृत्तीला थारा देत नाहीं, ज्यांचें मन संकुचित, संकीर्ण व कृत्रिम आहे अशांस असे ग्रंथ कसे जगास देतां येतील ? सज्जनांचा छळ होतो आहे हे पाहून वाचकांस सज्जनांशीं प्रेमसंबद्ध करणें हें विद्यासागरच करूं जाणोत; येरा वाङ्मयसेवकांचें तें काम नाहीं.

बंगाली वाङ्मयांत विरामचिन्हें प्रथम विद्यासागर यांनीं आणिलीं. नाहीं तर संस्कृतप्रमाणें एक उभी रेषा एवढेंच काय तें विरामचिन्ह बंगालींत लोकांत माहीत होतें. इतर भाषांतही हीच अवस्था होती. याच्या पूर्वीं सर्वच गोंधळ असे. मोरोपंतांच्या पोथ्यांत असे विराम नसल्यामुळें पुष्कळ वेळां कवितांचे अर्थ समजावयास कसा त्रास होत असे हें आपणांस कल्पनेनें जाणतां येईल.

**बंगाली भाषेंत** वृत्तपत्र नीट पद्धतशीर चालविण्याचें श्रेयसुद्धां विद्यासागर यांसच देणें समुचित होय. या त्यांच्या वृत्तपत्राचें नांव 'सोमप्रकाश' (इंदुप्रकाश) असें होतें. ते या वृत्तपत्राचे संपादक नव्हते, परंतु त्यांच्याच स्फूर्तीनें व तंत्रानें या पत्राचा सर्व कारभार चाले. हें पत्र पुढें द्वारकानाथ विद्याभूषण हे चालवूं लागले. सदरहू विद्याभूषण विद्वान् व समर्थ असे लेखक होते; व हे संपादक होते त्या वेळेस हें **सोमप्रकाश** बंगालमध्यें फारच प्रिय झालें होतें. त्याचा प्रसार पुष्कळ झाला होता. जरी संपादक द्वारकानाथ होते, तरी विद्यासागर यांचा मोठाच आधार त्यांस असे. नेहमीं विद्यासागरां-

ची सहानुभूति व सल्ला या संपादकांस मिळत असे. सोमप्रकाशांत विद्यासागर पुष्कळ वेळां लिहीत व त्यांचें लिहिणें अर्थातच पहिल्या प्रतीचें असे.

रवींद्रनाथ हे आज सर्वविश्वश्रुत आहेत. त्यांचे परमपूज्य वडील देवेंद्रनाथ यांस लोक महर्षि असें संबोधीत. देवेंद्रनाथ 'तत्त्वबोधिनी' नांवाचें एक मासिक चालवीत असत. या मासिकास आश्रय देणारे, सल्ला देणारे व नेहमीं लेख वगैरे लिहून देणारे ईश्वरचंद्र होते.

विद्यासागर यांनीं एकंदर लहान मोठीं ५२ पुस्तकें लिहिलीं. यांपैकीं १७ पुस्तकांचा संस्कृत भाषेंत प्रवेश करून देणारीं क्रमिक पुस्तकें, कांहीं संस्कृत उताऱ्यांचीं पुस्तकें, व्याकरणादि पुस्तकांस लिहिलेल्या प्रस्तावना, यांच्यांत समावेश होतो. व्याकरणकौमुदी हा त्यांचा मोठा सुंदर व अगदीं नवीन तऱ्हेनें लिहिलेला ग्रंथ आहे. भांडारकर यांचीं पुस्तकें याच नमुन्याचीं आहेत. विद्यासागर यांनीं इंग्रजींतून लिहिलें नाहीं एवढाच फरक, परंतु हा महत्त्वाचा फरक होय. त्याशिवाय सोपीं, सरळ अशीं मूळ संस्कृत सूत्रें, आणि कधीं स्वयंरचित सूत्रेंही ते विद्यार्थ्यांस स्मरणसाहाय्य व्हावें म्हणून योजीत. या पुस्तकाच्या अद्यापही कित्येक आवृत्ति बंगाली भाषेंत निघतात. हें पुस्तक लिहिण्यापूर्वी फारच थोडे लोक संस्कृत शिकण्यास धजत. संस्कृत—व्याकरण म्हणजे एक बाऊ वाटे. विद्यासागर यांनीं प्रथमच जेव्हां नोकरी धरिली त्या वेळेस उपक्रमणिका हा ग्रंथ त्यांनीं लिहिला. हा ग्रंथ संस्कृत शिकणाऱ्यांसाठीं होता. याची हकीगत जरा मजेची आहे. एकदां ईश्वरचंद्रांचे मित्र रामकृष्ण बानर्जी हे त्यांच्या घरीं आले होते. त्या वेळेस ईश्वरचंद्रांचे लहान भाऊ मोठ्या गोड आवाजानें संस्कृत श्लोक म्हणत होते. रामकृष्णांस तें मुलांचें श्लोक म्हणणें फारच आवडलें. आपणांस असे श्लोक म्हणतां आले तर काय गंमत होईल असें ते सहज बोलले. "मला संस्कृत शिकण्यासाठीं एखादें सोपें साधन द्याल तर मी संस्कृत शिकेन," असें रामकृष्ण यांनीं विद्यासागर यांस सांगितलें. त्याच दिवशीं रातोरात बसून ही 'उपक्रमणिका' विद्यासागर यांनीं लिहून काढिली व इंग्रजी शिकलेल्या बंगाली लोकांसही सोप्या पद्धतीनें संस्कृत शिकण्याचा मार्ग त्यांनीं मोकळा करून दिला.

रघुवंश, किरातार्जुनीय, शिशुपालवध, मेघदूत वगैरे संस्कृत महाकाव्यें व खंडकाव्यें त्यांनीं प्रकाशित केलीं. शाकुंतलाची प्रत तर त्यांनीं फार कष्टानें तयार केली. सर्व हिंदुस्थानांतील हस्तलिखितें गोळा करून, त्यांची तुलना

करून निरनिराळे पाठभेद लक्षांत घेऊन त्यांनीं सुंदर अशी प्रत प्रसिद्ध केली. यास त्यांनीं संस्कृतांत टीपा पण स्वतः लिहिल्या आहेत. त्यांनीं इंग्रजी पांच पुस्तकें लिहिलीं. त्यांतील 'विधवा–पुनर्विवाह' हें स्वतः त्यांचें व बाकीचीं ४ पुस्तकें केवळ 'संग्रह' आहेत ( Collection of extracts ). उरलेल्या ३० पुस्तकांपैकीं १४ महाविद्यालय व विद्यालय यांतील अभ्यास–पुस्तकें आहेत; व बाकीचीं अनेक विषयांवर आहेत. यांतील कांहीं इंग्रजी पुस्तकांचे अनुवाद आहेत; कांहींमधील साहित्य दुसऱ्यांपासून घेतलेलें असून मांडणी मात्र विद्यासागर यांची आहे.

या पुस्तकांशिवाय भारतवर्षाचा एक प्रचंड इतिहास बंगाली भाषेंत लिहिण्यासाठीं ते साहित्य जमा करीत होते. परंतु हें पुस्तक पूर्ण झालें नाहीं. आयुष्याच्या अंतापर्यंत ते या पुस्तकासाठीं, या ग्रंथासाठीं श्रम करण्यास उत्सुक होते; परंतु ग्रंथ लिहून झाला नाहीं याचें वाईट वाटतें. पुष्कळ पुस्तकें त्यांनीं अर्धवट लिहिलीं व तीं आपल्या अनेक मित्रांस पूर्ण करावयास सांगितलीं. त्या मित्रांनीं तीं पूर्ण करून ते स्वतः श्रीमंत झाले. ईश्वरचंद्रांचा उदार स्वभाव अमर्याद होता. ईश्वरचंद्रांची लेखक या नात्यानें ख्याति सर्व बंगालमध्यें आतां स्थिर झाली होती. त्यांनीं लिहिलेल्या पुस्तकावर वाचकांच्या उड्या पडत. असें असतां, अशा स्पृहणीय वाङ्मयस्थानीं विराजत असतां एका होतकरू ग्रंथकारासंबंधीं अनुपम औदार्य विद्यासागर यांनीं दाखविलें तें अभूतपूर्व होय. ईश्वरचंद्र 'रामाचा राज्याभिषेक' हा ग्रंथ लिहीत होते. ग्रंथ छापत होता. अर्धा अधिक छापूनहि झाला. अशा वेळीं 'त्याच विषयावर' अन्य एका ग्रंथकारानें ग्रंथ लिहिला होता व त्या ग्रंथाची प्रत त्यानें विद्यासागर यांस भेट म्हणून पाठविली. आपलें पुस्तक छापून बाहेर पडलें, तर या ग्रंथकाराचे श्रम वायां जातील, कारण त्याच्या ग्रंथास लोक आश्रय देणार नाहींत हें विद्यासागर यांस माहित होतें. विद्यासागर यांनीं आपलें पुस्तक छापण्याचें तात्काळ बंद ठेवलें व अशा प्रकारें त्या अभ्युदयेच्छु ग्रंथकारावर उपकार केले. केवढें हें औदार्य व केवढा मनाचा हा मोठेपणा !

———

# प्रकरण ७ वें

## स्त्री-शिक्षणासंबंधींची कामगिरी

बंगालमध्यें स्त्रीशिक्षणाचा प्रसार करणारे मूळ गृहस्थ बेथून नांवाचे युरोपियन होते. हे गृहस्थ फार दयाळु हृदयाचे होते. बंगाल सरकारच्या कार्य-कारी मंडळाचे ते सभासद होते. त्यांचा दर्जा फार मोठा होता; त्यांस युरोपियन लोकांत मोठा मान मिळे. बेथून यांच्या पूर्वींही कलकत्त्याच्या कांहीं भागांत मुलींच्या शिक्षणासाठीं शाळा स्थापन झाल्या होत्या. परंतु या सर्व अस्तित्वांत आल्या आणि लवकरच नामशेष झाल्या. ज्यानें स्त्रीशिक्षण भक्कम पायावर उभारलें तो पुरुष बेथून हा होय. बेथूनप्रमाणें ज्यांचें हृदय परस्थां-साठीं तळमळतें असे लोक केव्हांही विरळेच असणार. धर्मानें निराळे, भाषेनें निराळे, आचारानें निराळे, सर्वतोपरी निराळे अशा पददलित लोकांसाठीं, जेत्यांमधील कोण माणूस करुणा दाखवील ! बेथून, डेव्हिड हेअर, अँण्ड्र्यूज, निवेदिता, यांसारखीं दुःखित लोकांस आपलीं समजणारीं माणसें पृथ्वीस भूषणें होत यांत शंका नाहीं. निरपेक्षपणें निराश्रितांस आश्रय देणारे, त्यांचे डोळे पुसणारे असे उदारधी भूतलावर किती सांपडणार ! अशा थोर कोटींतील बेथून हे एक गृहस्थ होते. गव्हर्नरच्या खालोखाल त्यांची प्रतिष्ठा होती; परंतु पूर्णपणें निरहंकार व बालकाप्रमाणें सरळ त्यांची मनोवृत्ति होती. परंतु जें कार्य ते हातीं घेऊं पाहात होते त्यांत, आचारविचारांची पूर्ण ओळख नसल्या-कारणानें बंगाली जनतेस बरोबर घेऊन, यश मिळविणें कठीण होतें. वजन-दार व विद्वान् बंगाली गृहस्थांचा पाठिंबा व साहाय्य मिळाल्याविना बेथून यांस आपला उद्देश सिद्धीस नेतां आला नसता. परंतु असा गृहस्थ त्यांस मिळाला. निरलसवृत्तीचा, उदार मनाचा महात्मा बेथून यांस भेटला. हे विद्यासागर होते.

बेथून व विद्यासागर यांची पहिली मुलाखत खालीलप्रमाणें घडून आली. संस्कृत महाविद्यालयाचे प्रमुख मायेट हे व फोर्ट वुइल्यमचे प्रमुख मार्शल हे दोघे विद्यासागर यांस प्रत्येक शिक्षणविषयक बाबतींत सल्ला विचारीत. सरकारनें प्रांतांत कोणतीहि शिक्षणविषयक चळवळ केली तर विद्यासागरांचें मत तेथें विचारांत घेण्यांत येई. एकदां हिंदु कॉलेजमधील वरिष्ठ वर्गांतील विद्यार्थ्यांची परीक्षा होती. त्यांस निबंध लिहावयास सांगावयाचे होते. या निबंधाचे परीक्षक

विद्यासागर होते. विद्यासागर यांनीं ' स्त्रीशिक्षण ' या विषयावर निबंध लिहावयास सांगितलें. ज्या विद्यार्थ्यांचा निबंध उत्कृष्ट ठरेल त्यास पारितोषिक द्यावयाचें होतें. बक्षीससमारंभास बेथून हे हजर होते. बेथून यांनीं एक लहानच पण सुंदर असें भाषण केलें. त्यांत ' हिंदुस्थानच्या कोनाकोपऱ्यांतही स्त्रीशिक्षणाचा प्रसार करा ' असें त्यांनीं मोठ्या कळकळीनें सांगितलें. स्त्री-शिक्षणाचा हा कैवारी व स्त्रियांबद्दल निरतिशय सहानुभूति बाळगिणारे ईश्वरचंद्र यांची येथें भेट झाली; व पुढें वरचेवर विद्यासागर या उदारधीकडे जाऊंयेऊं लागले. बेथून यांच्याकडे शिक्षणखातें होतें व त्यामुळेंही विद्यासागर यांस वरचेवर त्यांच्याकडे जावें लागे. दोघांमध्यें मोठी मैत्री जमून आली. दोन थोर महात्म्यांची मैत्री म्हणजे एक आनंदाचें व विश्रांतीचें स्थान होय.

कांहीं सुशिक्षित एतद्देशीयांच्या मदतीनें व साहाय्यानें बेथून यांनीं मुलींसाठीं विद्यालय काढलें. विद्यासागर हे या शाळेचे पहिले सूत्रचालक सेक्रेटरी होते. जोंपर्यंत बेथून जिवंत होते, तोंपर्यंत या दोघां एकनिष्ठ कार्यकर्त्यांनीं अहर्निश परिश्रम करून या शाळेची जोपासना चालविली. परंतु बेथून इहलोक सोडून गेल्यावर या शाळेची संपूर्ण जबाबदारी विद्यासागर यांचे अंगावर पडली. स्त्रीशिक्षणास विरोध करणाऱ्यांनीं ही वेळ साधली व या संस्थेस मूठमाती देण्यासाठीं ते तयार झाले. शाळा सुरक्षित राहावी म्हणून कोणी तरी मोठा वजनदार पुरस्कर्ता पाहिजे होता. सुदैवेंकरून विद्यासागर यांस लेडी कॅनिंग यांची जोड मिळाली. दयाळू कॅनिंग म्हणून जो गव्हर्नर जनरल प्रसिद्ध आहे, त्याची ही पत्नी. लागेल ती मदत आपण या संस्थेस करूं असें श्रीमती कॅनिंग यांनीं अभिवचन दिलें. बेथून व लेडी कॅनिंग या दोघांच्या नांवांचा पुरस्कार करून या मोडणारे शाळेस त्यांनीं उचलून धरिलें; कोसळणाऱ्या डोलाऱ्यास सांभाळलें. पुढें पुढें इतर अधिकाऱ्यांजवळ फार मतभेद होऊं लागला म्हणून या संस्थेचा अधिकारसंबंध त्यांनीं सोडून दिला. प्रत्यक्ष संबंध सोडला, तरी अप्रत्यक्षपणें संस्थेच्या समुन्नतीसाठीं जेवढें करतां येणें शक्य तेवढें विद्यासागर करीत असत. या विद्यालयाचें पुढें महाविद्यालही सुरू करण्यांत आलें.

बेथूनची प्रेमळ स्मृति, या संस्थेवरील प्रेम या गोष्टी विद्यासागर यांच्या हृदयांतून केव्हांही दूर झाल्या नाहींत. विद्यासागर इहलोक सोडून जाण्यापूर्वी एकच वर्ष पुढील गोष्ट घडून आली. बेथून कॉलेजमध्यें आपल्या एका मित्राच्या सुनेस प्रवेश मिळावा म्हणून विद्यासागर या कॉलेजमध्यें गेले होते. शाळेंतील

विद्यार्थिनी, शिक्षकिणी वगैरे सर्व पाहून ईश्वरचंद्र यांस प्रेमाचें भरतें आलें. आपला आनंद शब्दांनीं कसा व्यक्त करावा हें त्यांस समजेना. महाविद्यालयांतील सर्व गुरुजनांस व छात्रगणास त्यांनीं एक चमचमीत मेजवानी दिली; मेजवानी चालू असतां कॉलेजच्या आवाराकडे विद्यासागर यांचें लक्ष होतें. एकदम घळघळ अश्रुधारा त्यांच्या डोळ्यांवाटें बाहेर येऊं लागल्या. सबंध दिवस ते गंभीर व विचार–मग्न होते. त्यांच्या जवळ काय आणि कसें बोलावें हें कोणासच समजेना. ईश्वरचंद्रांस कां दुःख होतें आहे, हें कसें विचारावें याचाच सर्वांस विचार पडला. शेवटीं ईश्वरचंद्रांचें ज्यांनीं बंगालींत चरित्र लिहिलें आहे, ते चण्डीदास विद्यासागर यांच्याकडे त्या दिवशीं आले होते. आंज विद्यासागर यांचा मुखचंद्रमा कां काळवंडलेला दिसतो हें त्यांस समजेना. निरभ्र आकाशांत मेघावडंबर कां जमलें हें त्यांस समजेना. बरें, हा प्रश्न तरी कसा विचारावा हें एक कोडेंच. शेवटीं सर्व धैर्य एकवटून त्या गृहस्थांनीं विद्यासागर यांस त्यांच्या दुःखांचें, चिंतेचें, खिन्नतेचें कारण विचारलें. "आपणांस आजपर्यंत खिन्न मीं कधींच पाहिलें नाहीं. कोणती चिंता आपणांस त्रास देते? कोणतें दडपण आपल्या मनावर पडलें आहे? कोणता विचार आपल्या चित्तास व्यग्र करीत आहे?" असें चण्डीदास यांनीं विचारलें. जो जो विद्यासागरांकडे आज पहात होता, त्या सर्वांस विद्यासागरांच्या दृष्टींत एक प्रकारचें अभिनव गांभीर्य दिसत होतें. त्या दृष्टींत असें कांहीं होतें कीं, जें दुसऱ्यांस मुकें व शांत बसवीत होतें. विचारलेल्या प्रश्नांस विद्यासागर यांनीं अगदीं अल्प उत्तर दिलें; "आज मी बेथून कॉलेजमध्यें गेलों होतों; तेथील सर्व व्यवस्था पाहून मला अत्यानंद झाला." तरी सुद्धां आज विद्यासागर असे गंभीर व खिन्न कां हें चण्डीदास यांस समजेना. तेव्हां ते पुनरपि म्हणाले, 'आनंद झाला, तर मग आज खिन्न कां? आपण रोजच्यासारखे कां नाहीं? मनांत व्यग्रता का आहे?' कंपितस्वरानें, भावनांनीं भरून येऊन विद्यासागर म्हणाले, 'आज किती विद्यार्थिनी शिक्षण घेत आहेत. कित्येक माजी विद्यार्थिनी आतां शिक्षकिणी आहेत. परंतु ज्या थोर पुरुषानें आपलें सर्वस्व या संस्थेच्या उभारणीसाठीं दिलें तो आज कोठें आहे? हें वैभव पाहावयाला, आपल्या संस्थेची ही भरभराट पाहावयास तो या जगांत राहिला नाहीं. बेथूनचें वर्णन मी काय व कसें करूं? किती सरळ वृत्ति, अंगीं गर्वाचा लेश नाहीं; पूर्ण निरहंकार झालेले. समाजांतील आपला दर्जा व मोठेपणा पार

विसरून त्यांनीं लहान मुलींस आपल्या पाठीवर घेऊन नाचावें! लहान मुलींनीं त्यांस घोडा करावें व त्यांच्यावर स्वार व्हावें. लहान मुलींशीं खेळतांना त्यांच्याबरोबर ज्यानें क्षणक्षणां, उंच असल्यामुळें वांकावें! लहान मुलींस पालकांकडून शाळेंत घेऊन यावें व पुनः त्यांस घरीं पोंचतें करावें—असे ते उदार महात्मे बेथून. ते आज हें सर्व पाहावयास कोठें आहेत? ज्याच्या पाठीवर बसणाऱ्या मुली आज शिकवीत आहेत, त्यांस पाहण्यास बेथून जगले नाहींत—त्यांचें तें भाग्य नव्हतें." एवढें बोलल्यावर त्यांस शोकावेग आवरेना. मूल हरवलेल्या आईप्रमाणें ते रडले. आई हरवलेल्या मुलाप्रमाणें ते रडले. एकीकडे आपल्या धोतरानें ते अश्रु पुशीत होते. बेथून यांच्या संस्मरणानें ते खिन्न झाले होते. हा वृक्ष लावणारा फळ पाहावयास राहिला नाहीं म्हणून त्यांस गहिंवरून आलें होतें; पुष्कळ वेळ स्फुंदन झाल्यावर मोठ्या जड अंतःकरणानें एक सुसकारा सोडून ते म्हणाले, "केवढा मोठा थोर माणूस आपल्या देशांत आला!"

बेथून कॉलेजच्याजवळ असलेल्या संबंधाशिवाय अन्य कित्येक मुलींच्या शाळांचे विद्यासागर हे संस्थापक होते. बरद्वान, मिदनापूर, हुगळी, नडिया या जिल्ह्यांत त्यांनीं अनेक शाळा स्थापल्या. बंगालच्या लेफ्टनंट गव्हर्नरांच्या तोंडी आश्वासनावर व आधारावर ईश्वरचंद्र विसंबून राहिले होते. परंतु पूर्वी सांगितल्याप्रमाणें जें खर्चाचें बिल मंजूर होईल म्हणून यंग यांनीं विद्यासागर यांस वचन दिलें होतें, तें बिल यंग यांनीं मंजूर केलें नाहीं. यंग आणि विद्यासागर यांच्यामध्यें आतां कायमचा विरोध उत्पन्न झाला. लेफ्टनंट गव्हर्नर यांनीं विद्यासागरांस यंगवर फिर्याद करण्यास सल्ला दिली; कारण लेफ्टनंटच्या शब्दावर विसंबून इतक्या शाळा विद्यासागर यांनीं काढल्या होत्या. हा सर्व पैसा विद्यासागर यांनीं कोठून मिळवावा? परंतु ईश्वरचंद्र कोर्ट—कचेऱ्या पाहणारे गृहस्थ नव्हते. या गोष्टींत गव्हर्नरचा संबंध येतो; आणि गव्हर्नर हे विद्यासागरांचे मित्र, तेव्हां हा दिवाणी प्रसंग विद्यासागर यांनीं टाळला.

ईश्वरचंद्र हे निराश होणारे नव्हते. हातीं घेतलेलें काम सोडून देणारे ते नव्हते. त्यांनीं जवळ जवळ ५० शाळा मुलींच्यासाठीं स्थापन केल्या होत्या. या सर्व शाळांचा खर्च एकट्या विद्यासागरांवर आतां पडला. ५०० रुपये पगाराच्या जागेचा त्यांनीं राजीनामा दिला होता.! विद्यासागर यांचे

कांहीं इंग्लिश मित्र त्यांस मदत करीत असत. सर सेसिल बेडन या गृहस्थांचें नांव तर विशेषेंकरून लक्षांत ठेवणें जरूर आहे. दर महिन्यास ५५ रुपये विद्यासागरांच्या फंडास ते देत असत. १८६६ मध्यें प्रख्यात विदुषी व शिक्षणशास्त्रज्ञ मिस मेरी कार्पेंटर कलकत्त्यास आली. राजाराममोहनराय यांनीं या विदुषीस भारतांतील स्त्रीवर्ग सुशिक्षित करण्यासाठीं स्फूर्ति दिली होती. कलकत्त्याचे नागरिकांनीं तिचें टोलेजंग स्वागत केलें. बेथूनचे स्नेही जे विद्यासागर, त्यांची गांठ घेण्यास कार्पेंटर बाई उत्सुक होत्या. बंगालमधील नारीसमाज त्यांस परिचयाचा करून घ्यावयाचा होता. बेथूनशाळेमध्यें विद्यासागर व कार्पेंटर बाई यांची भेट झाली. पुढें या दोघांमधील मैत्री अत्यंत उदात्त स्वरूपाची व दृढतम अशी झाली. ईश्वरचंद्र यांची प्रकृति नीट नसली तरी सुद्धां कार्पेंटरबाईनीं 'कोठें एकादी नवीन शाळा उघडावयाची आहे, चला,' असें सांगितलें कीं ते जावयास तयार व्हावयाचे. एकदां असेंच उत्तरपारा कन्याशाळेस भेट देण्यास विद्यासागर चालले होते. ज्या गाडींतून विद्यासागर जात होते, ती गाडी एका कोंपऱ्यावर उलटली. विद्यासागर खालीं पडले व त्यांस जबर जखम लागली. त्यांस उजव्या बाजूस बरगडयांच्या खालीं बरेंच लागलें. रस्त्याच्या एका कोपऱ्यांत बेसावध स्थितींत विद्यासागर पडले होते. त्यांच्या सभोंवार पुष्कळ गर्दी सुद्धां जमली होती. परंतु त्यांच्यापैकीं एकासही विद्यासागरांस उपचार करण्याची बुद्धि झाली नाहीं. आपल्या देशांत हल्लीं ही स्थिति सर्वत्र दिसून येते. दुसऱ्याच्या मदतीस धांवावयास आपण नेहमीं मागें असतों. आगगाडींत एकादा गलेलठ्ठ दुसऱ्यास मारूं लागला तर इतर टकमक पाहतात. किंवा हंसतात. अंगचोरपणा कर्तव्यविन्मुखता, स्वतःची कातडी सांभाळणें एवढेंच आम्हांस हल्लीं दिसतें. संकटांत जरा जीव घालणें आमच्या जिवावर येतें. आमच्या अशा या राष्ट्रीय प्रवृत्तीचा धिक्कार असो! कार्पेंटरबाईची गाडी विद्यासागर यांच्या गाडीच्या पाठीमागून आली. ती खालीं उतरली; तिनें विद्यासागर यांस रस्त्यांतून बाजूस नेलें. त्यांचें मस्तक मांडीवर घेऊन ती त्यांस वारा घालून सावध करूं लागली. आईच्या मांडीवर असलेल्या मुलाप्रमाणें ईश्वरचंद्र होते. वात्सल्यरसास पूर आला होता. ईश्वरचंद्र हे सावध झाल्यावर त्यांस काय वाटलें असेल? आपल्या आईजवळ आहों असें आपणांस वाटलें असें त्यांनीं सांगितलें.

ही गोष्ट मोठ्या प्रेमानें व आदर बुद्धीनें विद्यासागर नेहमीं सांगावयाचे. ज्या

राष्ट्रांत कार्पेंटरबाई जन्मली तें राष्ट्र धन्य होय; तो स्त्रीवर्गही धन्य होय, असे ते उद्गार काढीत.

ईश्वरचंद्र हे व्यवहारज्ञ होते. केवळ ध्येयानंदांत निमग्न होऊन राहणारे कल्पना-पंडित नव्हते. ध्येयें मूर्त पाहण्यास ते प्रयत्न करीत. अवास्तव व अव्यवहार्य ते उराशीं धरून बसत नसत. हिंदु समाजाची पुराणप्रियता त्यांस पूर्ण माहीत होती. कशा परिस्थितींत कोणत्या प्रकारें किती शिक्षण, स्त्री-शिक्षण प्रसार पावेल हें त्यांस जाणतां येत असे. त्यांची दृष्टि दूरवरचा विचार करणारी होती; त्यांची बुद्धि व्यवहारास धरून वागणारी असे. बंगालच्या वरिष्ठ व मध्यम वर्गांतील कांहीं स्त्रियांस शिक्षण देऊन त्यांस सुशिक्षिणी करण्यासाठीं एक ' नॉर्मल स्कूल ' काढावें असें कार्पेंटरबाईंनीं सुचविलें. विद्यासागर यांनीं या गोष्टीस विरोध केला. विद्यासागरांचें या बाबतींत खालीलप्रमाणें मत होतें व तें त्यांनीं सर वुइल्यम ग्रे यांस कळविलें होतें.

" नार्मल स्कूलचा उद्देश हा आहे कीं, गरीब घराण्यांतील विधवांस या शाळेंत शिकवून, प्राथमिक शिक्षणाचा प्रसार करण्यास त्यांस खेड्यांतून पाठविणें. परंतु खेड्यांमध्यें शिक्षणप्रसार करण्याचें धैर्य या गरीब विधवांस होणार नाहीं. स्वतंत्रपणें शिक्षणाचा धंदा करण्याइतकी स्वतंत्रता स्त्रियांत नाहीं व लोक ती देणार नाहींत! श्रीमंत घराण्यांतील व जास्त शिकलेल्या स्त्रियांस तुम्ही या नॉर्मल स्कूलमध्यें घेऊन थोडेसें शिक्षणशास्त्र शिकवून पाठवूं म्हणाल तरी तें अशक्य आहे. कारण या बड्या घराण्यांतील जास्त शिकलेल्या स्त्रिया दूर खेड्यांत प्राथमिक शिक्षणार्थ आयुष्य वाहण्यास तयार होणार नाहींत. त्यांना शहरांतील आयुष्यक्रमाची चटक लागलेली असते. खेडेगांवांतील एकविध व नीरस वातावरण त्यांच्या मनास मोह पाडणार नाहीं, मनास रुचणार नाहीं. एकंदरींत हीं नॉर्मलस्कुलें सद्यःस्थितींत क्षुद्र-कामाचीं ठरतील असें मला वाटतें. "

परंतु शेवटीं हें नॉर्मल स्कूल स्थापन करण्यांत आलेंच. यांत ५।६ लोक प्रथम आले. परंतु दीड वर्षानें हें नॉर्मल स्कूल बंद करावें लागलें. परंतु ट्रेंड अशा स्त्रीशिक्षकांची आजही फार आवश्यकता आहे व तो प्रश्न सुटला नाहीं.

अन्य पुष्कळ स्त्रीशिक्षणप्रसार करणाऱ्या मंडळींबरोबरही विद्यासागर यांचा संबंध असे. विद्यासागरांचा संबंध म्हणजे केवळ शाब्दिक सहानुभूतीच नसे. तेथें खरा मनोभावपूर्वक संबंध असे. प्रत्यक्ष चांगली मदत केल्याशिवाय

ते स्वस्थ बसावयाचे नाहींत. जी विद्यार्थिनी प्रथम एम्. ए. झाली, त्या विद्यार्थिनीस त्यांनीं शेक्सपिअर यांचे समग्र सुंदर ग्रंथ अर्पण केले.

या पुस्तकांतील पहिल्या खंडावर खालील अर्पणपत्रिका होती.

श्रीमती–कुमारी चंद्रमुखी वसू, पहिली एम् ए.
परीक्षा उत्तीर्ण झालेली बंगाली कुमारी–यांस अर्पण

कल्याण व शुभेच्छु हितचिंतक
**ईश्वरचंद्र शर्मा** यांजकडून.

अशा प्रकारें स्त्रीशिक्षणास जेवढी शारीरिक, मानसिक व आर्थिक मदत करतां आली तितकी या महाभागानें आमरण केली.

---

## प्रकरण ८ वें

## " स्त्री–शिक्षणाव्यतिरिक्त अन्य शिक्षणविषयक कामगिरी "

विद्यासागर यांचे वडील ठाकुरदास वंद्योपाध्याय यांची एक मोठी इच्छा होती कीं, त्यांच्या स्वतःच्या गांवीं विद्यासागर यांनीं पाठशाला, संस्कृत पाठशाळा उघडावी. या शाळेंत गरीब विद्यार्थ्यांस मोफत शिक्षण मिळावें. जमल्यास त्यांच्या पोटापाण्याची पण सोय करावी, असा त्यांचा मानस होता. विद्यासागर विद्यार्थिदशेंत असतांनाच, त्यांना मिळणाऱ्या शिष्यवृत्तीच्या पैशांतून कांहीं जमीन खरेदी करण्याचा विचार ठाकुरदास यांच्या मनांत आला होता व थोडी जमीन त्यांनीं खरेदी पण केली होती; कांहीं जुने ग्रंथ सुद्धा विकत घेण्यांत आले होते. परंतु पैशाच्या अभावीं सर्व बेत जागच्या जागीं राहतात. " उत्पद्यंते विलीयंते दरिद्राणां मनोरथाः।"

बापाची अपूर्ण इच्छा विद्यासागर पुरी करण्यास पुढें आले. ते संस्कृत महाविद्यालयाचे मुख्य असतां त्यांस बराच मोठा पगार मिळे. परंतु वडिलांची इच्छा त्याच स्वरूपांत पूर्ण करणें त्यांस हितावह–तितकें हितावह वाटलें नाहीं. इंग्रजी शिक्षणाचे फायदे, त्यांनीं पाहिले होते. नवीन विचारप्रवर्तक हें शिक्षण आहे. रूढीचे गुलामांस, परंपरागत रुळलेल्या मार्गानें जाणाऱ्यांस, आंधळ्यास

हें शिक्षण लाभलें तरी बरें होईल, निदान कोठें, कां, कसें असे प्रश्न तरी हे लोक विचारूं लागतील असें विद्यासागर यांस वाटलें. लोक विचारखातावरणांत खेळूं लागावे हें सर्वांत मुख्य काम. विचारांचें साम्राज्य सर्वांत श्रेष्ठ होय. तरवारीपेक्षां विचारशक्तीस सरकार भितें. मनांत असा विचार करून संस्कृत पाठशाळा उघडण्याऐवजीं विद्यासागरांनीं आपल्या मूळ गांवीं एक इंग्रजी शाळा उघडली. या शाळेसाठीं महिना ३०० रुपये त्यांस खर्चावे लागत. ही शाळा अद्याप आहे. हल्लीं तिचें नांव 'भगवती विद्यालय' असें आहे. विद्यासागर यांच्या मातेचें नांव भगवती होतें.

विद्यासागर जेथें जेथें जात, तेथें तेथें तंत्रस्थ, वजनदार व मातबर लोकांस ते शिक्षणप्रसार करण्यास सांगत. शिक्षण सवंग व स्वस्त व्हावें, शिक्षण घेण्यास गरीब–गुरिबांस सोयीचें व सुखाचें व्हावें, यासाठीं खेडोपाडीं शाळांचें जाळें पसरणें कसें आवश्यक आहे हें ते सर्वांस पटवून देत.

कांहीं जमीनदार व श्रीमंत लोकांनीं कलकत्त्यांत एक शाळा चालविली होती. आपल्या देशांतील लोकांच्या नेहमींच्या मनोधर्माप्रमाणें या शाळेंतील चालकांत फाटाफूट होऊन निरनिराळ्या शाळा या एका शाळेच्या झाल्या. या दोन शाळांपैकीं एका शाळेच्या चालकांनीं ईश्वरचंद्रांस आपल्या गोटांत आणलें. ईश्वरचंद्र हे योग्य ते सल्ला देऊं लागले. ही संस्था आपलीच समजून ईश्वरचंद्र तदर्थ झटूं लागले, खटपटी करूं लागले. ज्या वस्तूस एकदां आपलें म्हटलें त्या वस्तूस थोर मनुष्य प्राणापेक्षांही जपत असतो.

ईश्वरचंद्र या संस्थेचें फार आस्थेनें संगोपन करीत आहेत, हें पाहून त्या शाळेच्या चालक-मंडळींतील पुष्कळ वड्या लोकांनीं सर्वच जबाबदारी ईश्वरचंद्रांवर सोंपविली. आणि या शाळेचे ईश्वरचंद्र जीव झाले. ईश्वरचंद्र आणि विद्यालय यांचा एकजीव झाला. शाळा भरभराटत चालली. नामांकित शिक्षक शाळेस मिळाले. तेव्हां विद्यालयाचें महाविद्यालयांत ईश्वरचंद्रांनीं रूपांतर केलें. या महाविद्यालयास ईश्वरचंद्र हयात होते तोंपर्यंत 'मेट्रापॉलिटन महाविद्यालय' असें नांव होतें. त्यांच्या निधनानंतर त्यास 'विद्यासागर महाविद्यालय' हें नांव मिळालें. महाविद्यालयासाठीं विद्यासागर अविश्रांत झगडले. मोठमोठे प्रोफेसर त्यांनीं मिळविले. त्यांस गुणांची पारख होती. हंस जसा पाण्यांतून दूध ग्रहण करितो, त्याप्रमाणें वेंचक माणसें ते घेत. अंबिकाचरण मुजुमदार 'The grand old man of

Faridpur ' ' फरीदपूर येथील वृद्ध मुनि,' जे लखनौच्या कॉंग्रेसला १९१६ मध्यें अध्यक्ष होते, ते या मेट्रापॉलिटन महाविद्यालयांत आचार्य होते. सुरेंद्रनाथ बानर्जी हे सुद्धां या महाविद्यालयास मिळाले. आय. सी. एस्. होऊन आल्यावर सुरेंद्रनाथ यांस सरकारनें मॅजिस्ट्रेटची जागा दिली होती. त्या जागेवर असतां कांहीं क्षुल्लक कारणांवरून सरकारनें सुरेंद्रनाथ यांस काढून टाकलें. सनदी नोकरींत सुरेंद्रांचा प्रवेश गोऱ्यांस सहन झाला नाहीं. ह्यूमसाहेबांनीं, एका युरोपीयनाचा असाच किंवहुना जरा मोठ्या स्वरूपाचा गुन्हा सरकारनें कसा सारवासारवीनें नाहींसा केला, व काळ्या आदमीस–तो विद्वान् व निरपराधी असतां–कसें कस्पटासमान लेखलें हें त्या वेळच्या 'हिंदु' पत्राच्या अंकांत दाखविलें होतें.

सुरेंद्रनाथ यांस त्या वेळीं नोकरी नव्हती. वकिली किंवा बॅरिस्टरी करण्याची कलकत्त्यास सोय नव्हती. परंतु अंधारांतून प्रकाश येतो, मरणांतून जीवन येतें, अभिनव व उदात्त जीवन लाभतें, तसेंच सुरेंद्रनाथांचें झालें. अन्यत्र सांगितलें आहे कीं, मद्यपानप्रतिबंधक चळवळ चालली असतां, एक प्रचंड जाहीर सभा कलकत्ता शहरांत भरली होती. त्या सभेंत सुरेंद्रनाथ यांस ' भाषण करा ' असा आग्रह करण्यांत आला. सुरेंद्रनाथांचें हें पहिलेंच भाषण; अद्याप सार्वजनिक सभांत ते बोलले नव्हते; परंतु आतां ते उभे राहिले; बोलले. सभा चित्राप्रमाणें तटस्थ झाली. दुसरे दिवशीं त्यांचे मित्र सुरेंद्रनाथांस म्हणाले, ' आपण कलकत्त्यांतील एक उत्कृष्ट व्याख्याते असें सर्वजण बोलूं लागले आहेत. ' सुरेंद्रांस समाधान झालें.

विद्यासागर या सभेंत हजर होते. त्यांनीं सुरेंद्रनाथांस आपल्या महाविद्यालयांत इंग्रजीचे अध्यापक होण्याबद्दल विनंती केली. पगार फार नव्हता. २०० रुपये होता. परंतु तरुण विद्यार्थि–गणांत मिसळण्याची सोन्याची संधि आली. तरुणांचीं मनें काबीज करण्याची वेळ आली. ही संधि गमावूं नये असा सुरेंद्रांनीं विचार केला. त्यांनीं ती जागा घेतली. तरुणांच्या मनांत त्यांनीं देशभक्ति उत्पन्न केली. विद्यार्थिसंघ स्थापन करून, त्या संघासमोर मॅझिनीसारख्या राष्ट्रभक्तांचीं चरित्रें त्यांनीं वर्णिलीं; नवीन संदेश त्यांनीं सांगितले. विद्यार्थ्यांस ते प्रिय झाले.

असें चाललें असतां ब्राह्मो समाजाच्या चालकांत कांहीं फाटाफूट झाली. शिवनाथशास्त्री वगैरे लोक केशवचंद्रांपासून फुटून निघाले. त्यांनीं सद्धर्मब्राह्मो-

समाज स्थापन केला. त्यांनीं नवीन ‘ सिटी कॉलेज ’ काढलें. या सिटी कॉलेजमध्यें आम्हास येऊन मिळा असें सुरेंद्रांस त्या महाविद्यालयाच्या चालकांनीं विनविलें. ते जास्त पगार देणार होते. आपणांस शिक्षण द्यावयाचें मग जर कौटुंबिक स्थिति सुधारत असेल तर तिकडे कां न जावें, असा विचार करून सुरेंद्र तिकडे जाण्यास कबूल झाले. त्यांनीं विद्यासागर यांस सर्व मजकूर विदित केला. विद्यासागर म्हणाले, ‘ पैशाचाच प्रश्न असेल, तर आपणांस येथें तशी ददात मी भासूं देणार नाहीं. मी आपणांस तिकडे देणार तेवढा पगार देतों. ’ सुरेंद्रनाथ ‘ येतों ’ असें सांगून चुकले होते. कारण विद्यासागर परवानगी देतील असें त्यांस वाटलें होतें. परंतु हा सगळा अनपेक्षित प्रकार घडून आला. शेवटीं ते विद्यासागरांस म्हणाले, ‘हें पाहा मी तुमच्या महाविद्यालयांत रोज एक तास शिकविण्यास येत जाईन; परंतु आतां तिकडे जाण्यास मला उदार मनानें परवानगी द्या. ’ विद्यासागर हे दुसऱ्याच्या अडचणी जाणणारे, ते स्वतःच्या अडचणीसाठीं दुसऱ्यांस दुःखांत किंवा संकटांत लोटणारे नव्हते. त्यांनीं सुरेंद्रनाथांस मोठ्या आनंदानें जावयास परवानगी दिली.

विद्यासागर यांनीं आपला अलोट पुस्तकसंग्रह आपल्या विद्यालयास—महाविद्यालयास अर्पण केला. त्यांचा ग्रंथसंग्रह किती बिनमोल असेल याची आपणांस कल्पना होणार नाहीं. विद्यासागर हे विद्येचे भोक्ते, ग्रंथांचें त्यांस वेड उत्तम प्रकारचीं बांधलेलीं पुस्तकें त्यांस फार आवडत. सोनेरी बांधणी ज्याची आहे अशा ग्रंथराजांनीं त्यांचा ग्रंथसंग्रह नटला होता. ते स्वतःची काळजी घेत नसत, परंतु पुस्तकांची घेत. कोणतेंही एखादें सुंदर व विद्वत्तापूर्ण, शोधपूर्ण पुस्तक परदेशांत प्रसिद्ध झालें तर तें विद्यासागर यांनीं आणलेंच. एकदां त्यांच्या एका मित्रानें त्यांस विचारलें, ‘विद्यासागर, आपल्या अंगावरील कपडे अगदीं भिकार, परंतु या पुस्तकांस मात्र कसें सोनेरी पोशाखानें तुम्हीं नटविलें आहे.’ विद्यासागर म्हणाले, ‘ही तुमच्या अंगावर शालजोडी मोठी भरजरी आहे. स्वतःचें शरीर भूषवावें असें जसें तुम्हांस वाटतें, तसें या पुस्तकांस सजवावें असें मला वाटतें.’ हरि नारायण आपटे—आपले प्रख्यात कादंबरीकार—यांची अशीच गोष्ट सांगतात. ते एक दिवस पुस्तकांस सुंदर कव्हरें घालीत बसले होते. ‘काय हो हरिभाऊ, किती त्या पुस्तकांस जपतां ? पुस्तकें तीं काय, त्यांस कव्हरें काय घालीत बसलांत’ असें कोणीं तरी सहज म्हटलें. हरिभाऊ म्हणाले, ‘अहो, हीं पुस्तकें मला मुलांप्रमाणें वाटतात. आई जशी

मुलीस निरनिराळे परकर आपण होऊन नेसवितें, तसेंच मला करावेसें वाटतें.' विद्यासागर यांनीं जर एकच पुस्तक निरनिराळ्या बांधणीचें, छपाईचें पाहिलें कीं त्यांच्या तीन प्रती घरीं झाल्या असल्या तरी ते विकत घ्यावयाचे.

त्यांच्या घरीं असलेल्या या अमोल ग्रंथसंग्रहाचा पुष्कळांस फायदा होई. परंतु पुढें पुढें ते पुस्तकें कोणास घरीं देत नसत. कारण एकदां काय झालें, एका वड्या महाविद्यालयांतील एक प्रोफेसर एक पुस्तक दुसरीकडे कोठें नव्हतें म्हणून विद्यासागर यांच्याकडे आले. विद्यासागर यांच्याकडे तें पुस्तक होतें. साहेबमजकूर हें पुस्तक घेऊन गेले. पुस्तकांचें संदर्भकार्य संपलें; परंतु प्रोफेसरसाहेब पुस्तक परत करावयास विसरले. त्यांस पुस्तकांची थोडीच आस्था होती ! थोडें काम झालें, झालें. पुढें कांहीं दिवसांनीं विद्यासागर यांस त्या पुस्तकाची जरूर लागली. त्यांनीं प्रोफेसरसाहेबांस ग्रंथ पाठवून देण्यास चिठी दिली. परंतु 'पुस्तक हरवलें दिलगीर आहे; क्षमा करावी' असें या प्रोफेसरांनीं उत्तर दिलें. ईश्वरचंद्रांस या हयगयीचा संताप आला. त्यांनीं तें पुस्तक मिळतें का म्हणून जर्मनींत चौकशी केली; कारण तें पुस्तक तेथें छापलेलें होतें. परंतु तें पुस्तक केव्हांच खपून गेलें होतें. त्याची प्रत उपलब्ध नव्हती. झालें. विद्यासागर यांस कायमची ठेंच लागली. पुढें कांहीं दिवसांनीं एक गंमत झाली. 'आपणांस जें पुस्तक पाहिजे, तें मजकडे आहे' असें एका जुन्या पुस्तकवाल्यानें विद्यासागरांस कळविलें. विद्यासागर तावडतोव त्या गृहस्थाकडे गेले व 'आपणांस हें पुस्तक कोणाकडून मिळालें' असा त्यांनीं प्रश्न केला. पुस्तकविक्यानें त्या गृहस्थाचें सर्व नांवगांव सांगितलें. ज्या गृहस्थानें हें पुस्तक विद्यासागर यांचेकडून नेलें होतें, त्याच गृहस्थानें आपल्या इतर ग्रंथांवरोबर हेंही पुस्तक विकून टाकलें. होतें. 'किं मिष्टमन्नं खरसूकराणां' असें म्हणणें जरी कठोर असलें तरी वरील प्रसंगीं योग्य नाहीं का ? अशा प्रकारचे विद्येचे भोक्ते, आचार्य असावे हें परम दुर्भाग्य होय ! आणि अशा आचार्य पदवीची प्रेसिडेन्सी कॉलेजमध्यें विद्यासागरांस जागा मिळत नाहीं ! !

असो. तर अशा विद्याभक्त ईश्वरचंद्रांनीं आपला सुंदर ग्रंथसंग्रह आपल्या आवडत्या महाविद्यालयास देऊन टाकला. सर्वतोपरी महाविद्यालय वाढवून पुढें ईश्वरचंद्रांनीं तें इतरांच्या हवालीं केलें. त्यांचें तें जिवंत स्मारक अद्यापही कलकत्त्यास उभें आहे.

ईश्वरचंद्र यांनीं इतर ठिकाणीं पण शाळा स्थापन केल्या. पश्चिम बंगालमध्यें चकधिया येथें एक हायस्कूल त्यांनींच चालविलें. तेथें एक मोफत दवाखाना पण त्यांनीं घातला. सर्व श्रीमंत जमीनदारांस वगैरे नेहमीं ते शिक्षणाचा प्रसार करावयास सांगत. शिक्षणप्रसारासारखें पवित्र कांहीं नाहीं; शिक्षणानें सकुंचित मनें विशाल होतात. हृदय मोठे होतें. मति विवेकशालिनी होते. वृथाभिमान, खोटी स्पर्धा, असूया, परतिरस्कार यांस हद्दपारी मिळते. दुसऱ्यांच्या विचाराबद्दल, आचाराबद्दल आपण सहानुभूति दाखवूं लागतों; यामुळें समाजांतील निरनिराळ्या अंगांत सलोखा व प्रेम उत्पन्न होतें. अज्ञानासारखा शत्रु नाहीं व ज्ञानासारखा मित्र नाहीं. हा ज्ञानप्रकाश अंधारांतील लोकांकडे आणण्यासाठीं विद्यासागर स्वतः आमरण झगडले व दुसऱ्यांस झगडण्यास त्यांनीं स्फूर्ति दिली.

---

## प्रकरण ९ वें

## समाजसुधारणा

१९ व्या शतकांतील बहुतेक सर्व चळवळींशीं प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षरीत्या विद्यासागर यांचा संबंध आला होता. अशी एकही चळवळ नव्हती, जेथें विद्यासागर हे नाहींत. असें जरी असलें, तथापि विद्यासागर यांचें नांव एका विवक्षित सुधारणेशीं कायमचें संलग्न झालें आहे. विधवापुनर्विवाह आणि एकपत्नीत्व या दोन सुधारणांशीं विद्यासागर यांचें नांव चिरंतन जोडलें जाईल. त्यांनीं आपले प्रयत्न या बाबतींत पराकाष्ठेस पोंचविले. त्यांचा दृढ निश्चय, त्यांचें धैर्य, त्यांची लोकोत्तर विद्वत्ता सर्व गोष्टी या चळवळींत दिसून आल्या.

हिंदु समाजांत, त्यांतल्या त्यांत ब्राम्हण वर्णांत अनेक विधवांचें करुणास्पद जीवन पाहून, ईश्वरचंद्र लहान होते त्या वेळेपासूनच दुःखीकष्टी होत असत. त्यांचें करुणहृदय दयेनें भरून येई. हें क्रौर्य, हा अन्याय पाहून त्यांच्या सरल बालहृदयास चीड व संताप येई. विषयविन्मुखता, भोगपराङ्मुखता, ब्रह्मचर्य या गोष्टी केव्हांही वंद्य व सेव्यच होत यांत तिलप्राय संशय नाहीं. परंतु व्यक्तीनें स्वतःच्या मनानें ज्या वेळेस स्वतःवर या लादलेल्या असतात,

त्या वेळेस त्या हितपरिणामी होतात. बायकांच्या बाबतींत ही विषयविरक्ति उत्पन्न करणें, आणि पुरुषांस मात्र अनेक स्त्रिया करूं देणें हा एकंदरींत अन्याय होय असें कोणीही प्रांजलवृत्तीचा माणूस कबूल करील. विद्यासागर लहान असतां, त्यांचे एक वाचस्पति नांवाचे गुरुजी होते. हे गुरुजी ८० वर्षांचे वृद्ध झाले होते. विद्यासागर हे सर्व गुरुजनांचे प्रिय शिष्य होते. या वाचस्पतीस पुनः लग्न करण्याची वासना झाली. या गुरुजींनीं आपला विचार कसा काय आहे याविषयीं विद्यासागर यांचें मत विचारलें. त्या वेळेस ईश्वर: यांचें वय फक्त १३ वर्षांचें होतें. या हास्यास्पद विचारानें ईश्वरचंद्रास अनावर संताप आला. 'आपण जर अशा वृद्धापकाळीं विवाह करून, एका अनाथ गरीब मुलीवर लवकरच वैधव्याचा महाअनर्थ आणणार असाल, तर आपल्या जवळचा माझा सर्व संबंध मी सोडून देईन' असें बाणेदार उत्तर ईश्वरचंद्रानें दिलें. परंतु आमचा समाज पहा कसा विचित्र! ऐंशी वर्षांचा जख्खड लग्नास उभा राहावयास समजा तयार झाला, तर त्यास मुलगी तरी कोण देणार? असा मांगहृदयी, कसाबकरणीचा पिता असेल का? हो. असे अगातेक पित असतात. या वाचस्पतीस एक सुंदर तरुण बायको मिळाली. विद्यासागर यांनीं या वाचस्पतीकडे जाण्याचें बंद केलें. परंतु वाचस्पती यांस तर विद्यासागर फार आवडे. नेहमीं ईश्वरचंद्रास स्वतःबरोबर आपल्या घरीं आणतां येईल तर पाहावें म्हणून वाचस्पती जंग जंग पछाडीत. परंतु छे. पुढें कांहीं दिवसांनीं, एकदां या वाचस्पतीस ईश्वराचें मन वळविण्यांत यश आलें. घरीं आल्यावर ईश्वरचंद्र व वाचस्पती यांचें बराच वेळ बोलणें चालणें झालें. शेवटीं ईश्वरचंद्र जावयास निघाले. परंतु स्वतःची बायको ईश्वरचंद्रानें एकदां तरी पाहावी, अशी त्या वाचस्पतीची फारच आग्रहाची इच्छा दिसली. त्याच्य बरोबर ईश्वरचंद्र अंतःपुरांत गेला. दूर अंतरावर उभें राहून त्यानें तिला प्रणिपात केला, व पुन्हां तो माघारें जावयास निघाला. वाचस्पती यांनीं त्याचा हात पकडला आणि आपल्या एका मोलकरणीला आपल्या बायकोच्या मुखावरील पडदा दूर करण्यास सांगितलें. विद्यासागर यानें त्या मुखमंडलाकडे पाहिलें मात्र आणि त्यास रडूं कोसळलें. या मुलीच्या भावी आयुष्यांतील दुःखद प्रसंगाचें चित्र ईश्वरचंद्रांच्या नयनांसमोर उभें राहिलें. हें भेसूर चित्र त्यास स्वस्थ बसूं देईना. ते रडले—मुलासारखे रडले. रागानें लाल झालेले ईश्वरचंद्र त्या घराबाहेर पडले व म्हणाले, 'मी या घरांत पाण्याचा एक थेंबही कधीं पिणार नाहीं.'

लहानपणीं विधवांच्या स्थितीबद्दल अशी अनुकंपा दाखविणारा बाल ईश्वर, पुढें तीच वृत्ति बाळगिता झाला. विद्यासागर यांच्या पूर्वींही विधवाविवाहाबद्दल खटपटी झाल्या होत्या. परंतु विद्यासागर यांनीं जें धैर्य, जो उत्साह, जी कळकळ दाखविली, ती मात्र आजपर्यंत अभूतपूर्व अशी होती. ते पिच्छा पुरवावयाचे, सारखे ध्येयाच्या मागें असावयाचे. अर्धवट कार्य सोडणें हा दाक्षिणात्यांचा स्वभाव त्यांस परिचित नव्हता.

ब्राह्मपंथीय लोक अनेक कारणांनीं हिंदुसमाजापासून निराळे मानले गेले. विद्यासागर हे ब्राह्मो नव्हते. हिंदुसमाजांतच राहून त्यांस जें काम करावयाचें होतें तें त्यांनीं केलें. यामुळें इतर सुधारणा करूं पाहणाऱ्यांस जें एक प्रकारचें संकुचितत्व प्राप्त होई, तें यांस नव्हतें. हे आपल्यामधीलच आहेत असें समाजास वाटे.

हिंदु जातीवर जुन्या शास्त्रीमंडळींचा विलक्षण ताबा आहे, हें ईश्वरचंद्र यांस माहीत होतें. तेव्हां या शास्त्रीमंडळींस आधीं आपण कुंठित केलें पाहिजे असा विद्यासागर यांनीं विचार केला. जुने हिंदुधर्मशास्त्रज्ञ विधवाविवाह मानतात कीं नाहीं? विधवाविवाह सशास्त्र आहे का अशास्त्र आहे, हें त्यांस एकदां नीट शोधून काढावयाचें होतें.

त्या वेळेस ईश्वरचंद्र संस्कृत महाविद्यालयाचें सर्व कामकाज करून नंतर आपला उरलेला वेळ स्मृतीचें अध्ययन करण्यांत दवडीत. असें सांगतात कीं, तिसरे प्रहरापासून तों सर्व रात्रभर, दुसरा दिवस उजाडेपर्यंत ते संस्कृत महाविद्यालयांतील जुन्या ग्रंथांच्या राशींत वाचीत बसलेले असावयाचे, सायंकाळ झाली म्हणजे त्यांचा एक मित्र त्यांस अल्पाहार करण्यास कांहीं तरी आणून देत असे; किंवा कधीं कधीं ते स्वतः मित्राच्या घरीं जाऊन, तेथें भोजन करून पुनः आपल्या ग्रंथालयांत–महाविद्यालयांत येत. महाविद्यालयांतील ग्रंथालय हेंच त्यांचें घर झालें होतें. त्यांस जुन्या धर्मशास्त्राचें आलोकन करून त्यांत कोठें पुनर्विवाहास संमति आहे कीं नाहीं हें पाहावयाचें होतें, हेंच एक वेड त्यांस लागलें. त्यांस अन्य कांहीं सुचेना. जसजसे जास्त दिवस जात चालले, तसतसे ते अधीर होऊं लागले.

एक दिवस मोठ्या कष्टी अंतःकरणानें, जड मनानें मंद मंद पाउलें टाकीत ते आपल्या घराकडे येत होते; पुनर्विवाहासंबंधीं असलेल्या कांहीं श्लोकांचा

त्यांस स्पष्ट अर्थ लागत नव्हता; त्या वचनांची नीट संगति त्यांस लावतां येत नव्हती. परंतु एकाएकीं त्या श्लोकांची, त्या वचनांची संगति कशी लावतां येईल याबद्दल त्यांच्या मनांत प्रकाश पडला. ते घरीं जात होते; परंतु पुनः परतले, महाविद्यालयांत आले. ते श्लोक घेऊन त्यांच्यावर त्यांनीं टीका लिहिली.

ही टीका लिहून संपली त्या वेळेस सूर्याचे सोनेरी किरण ग्रंथालयाच्या वातायनांतून आंत डोकावूं लागले होते. विद्यासागरांचें हृदय आनंदानें भरून आलें. आपणांस जें पाहिजे होतें तें मिळालें, जें शोधीत होतों तें लाभलें असें पाहून त्यांस सर्व श्रमांचा परिहार झाल्याप्रमाणें वाटलें. त्यांचे विचार सूर्यकिरणांप्रमाणें सुंदर होते; त्याप्रमाणें त्यांच्या हृदयांत आनंद होता; आशा खेळूं लागली, दुःख दूर झालें; कष्ट कोठेंच निघून गेले. आनंदभरांत 'शेवटीं मला मिळालें, शेवटीं मला सांपडलें' असें ते कितीदा म्हणाले व टाळ्या पिटून नाचले. सत्त्वासाठीं एखाद्या ध्येयासाठीं कष्ट करणाऱ्यास त्या ध्येयप्राप्तीनंतर जो आनंद प्राप्त होतो त्याची खरी गोडी तेच जाणोत. इतरांस त्या आनंदाची कल्पना येणें शक्य नाहीं. ईश्वरचंद्रांचे मित्र या सुमारास त्यांच्या खोलींत जमा झाले होते. एवढा आनंद ईश्वरचंद्रांस कां झाला, ईश्वरचंद्रांस काय मिळालें हें त्यांच्या लक्षांत येईना. 'काय, सांपडलें तरी काय आपणांला' असें सकौतुक त्या मित्रमंडळीनें त्यांस पुसलें. सर्व हकीकत विद्यासागर यांनीं त्या मित्रांस सांगितली. विद्यासागरांच्या श्रमांचें सार्थक झालें असें त्यांस वाटलें.

या टीकेच्या समर्थनार्थ, परंपरागत मार्गानें चालणारे, रूढीचे गुलाम अशा लोकांजवळ, त्यांस कसकसे वादविवाद करावे लागले हें येथें सांगत बसण्यांत अर्थ नाहीं. एवढें सांगितलें म्हणजें पुरे कीं त्यांचे मुद्दे पूर्णपणें खात्री करून देणारे होते. त्यांनीं केलेलें पुनर्विवाहसमर्थन सशास्त्र होतें. नीट शांतपणें पाहणाऱ्यास त्यांनीं तसें पटवूनही दिलें, पुनर्विवाहास सशास्त्र संमति मिळावी एतदर्थ त्यांनीं दोन पुस्तकें लिहिलीं आणि त्यांत जेवढा म्हणून पुरावा आणावयास पाहिजे तेवढा त्यांनीं आणला व प्रतिपक्षाची पुरेपुर खाली करून दिली. जुन्या पंडितांनीं या श्लोकांचा निराळ्या तऱ्हेनें अर्थ लावण्याची लटपट केली. परंतु ती वायफळ, टाकाऊ व परित्याज्य होती, हें विद्यासागर यांनीं पूर्वापार संबंधदर्शनानें सर्वांस—निर्मलमतींस पटवून दिलें. ते श्लोक असे—

नष्टे मृते प्रव्रजिते, क्लीबेच पतिते पतौ
पंचस्वापत्सु नारीणां पतिरन्यो विधीयते ॥

“ पति नाहींसा झाला असतां, मरण पावला असतां, व्राजक ( संन्यासी ) झाला असतां, नपुंसक असतां, किंवा समाजापासून भ्रष्ट झाला असतां, या पांचही आपत्तींत स्त्रियांनीं दुसरा भ्रतार करावा अशी शास्त्राची सांगी आहे.”

तिस्रः कोट्योऽर्धकोटीच यानि लोमानि मानवे
तावत्कालं वसेत्स्वर्गं भर्तारं यानुगच्छति ॥

“ पतिमरणानंतरही जी साध्वी ब्रह्मचारीव्रतानें राहते, तिला इतर ब्रह्मचारी पुरुषांप्रमाणें स्वर्गप्राप्ति होईल. जी साध्वी पतीबरोबर सहगमन करते, ती शरीरावर असणाऱ्या सर्व केसांगणिक वर्षें स्वर्गसुख अनुभवील.”

‘ कलौ पाराशरस्मृतिः ’ असें वचन आहे. कलियुगांत पराशराची स्मृति प्रमुख मानिली जावी असा या वचनाचा स्वच्छ अर्थ आहे. या पराशर स्मृतींतच वरील दोन श्लोक आहेत. हे श्लोक ज्या मुलीचें लग्न जमलें आहे, त्या मुलीस उद्देशून आहेत; एखाद्या मुलीचें लग्न जमलें, आणि मग ज्याबरोबर लग्न व्हावयाचें तो परिणेय वर जर लग्न होण्यापूर्वीं नष्ट झाला, मृत झाला – वगैरे – तर त्या मुलीचें लग्न अन्याबरोबर करावयास हरकत नाहीं, असा या श्लोकांचा अर्थ आहे असें जुने पंडित म्हणूं लागले. प्रत्यक्ष लग्न झालेल्या स्त्रीस हे श्लोक सांगितले नाहींत, असा त्यांनीं बुद्धिवाद केला. परंतु या बुद्धिवादाचे तेव्हांच तुकडे उडविणारी विद्यासागर यांची बुद्धि होती. त्यांनीं या सर्व गोष्टींचा पूर्वींच विचार केला होता.

विद्यासागर म्हणाले कीं पहिला श्लोक अशा अर्थानें जर घेतला तर खालील श्लोक नीट सुसंबद्ध दिसत नाहीं. खालील श्लोकांत पतिनिधनोत्तर ब्रह्मचारीव्रतानें राहणारी स्त्री आणि सहगमन करणारी स्त्री यांची प्रशंसा केलेली आहे. अर्थात् तो श्लोक अद्याप अविवाहित अशा मुलींना उद्देशून खास नाहीं. मग हा श्लोक जर पतिमरणानंतर स्त्रियांनीं काय करावें एतद्विषयीं स्वच्छ दिसतो, तर त्याच्यावरीलच श्लोक मात्र अद्याप लग्न न झालेल्या मुलींस उद्देशून आहे असें म्हणणें अप्रयोजक दिसतें. ज्या अर्थीं दोन्ही श्लोक एके ठिकाणीं आहेत त्या अर्थीं पतिमरणानंतर उत्तरोत्तर उत्तम असे मार्गच येथें सांगितलेले

असले पाहिजेत. कनिष्ठ मार्ग म्हणजे पुनर्विवाह करावा; त्याच्याहून श्रेष्ठतर मार्ग म्हणजे ब्रह्मचारीव्रतस्थिति; आणि त्याहूनही उत्कृष्ट मार्ग म्हटला म्हणजे सहगमन करणें. या श्रेष्ठ-कनिष्ठपणाबद्दल मुळींच भेद नाहीं. सहगमन करण्यास पतिनिष्ठा फारच सोज्ज्वळ असावी लागेल. ती नारी खरोखर त्रिभुवनवंद्य आहे. ब्रह्मचारीव्रतानें राहून, व्रतें–वैकल्यें–उपोषणें करून मन निर्मळ व पवित्र करूं पाहणारी नारी पण धन्य होय. विषयांतून, वासनांच्या गर्तेतून मन काढून घेऊन, बाळकृष्णचरणीं लावणाऱ्या ललना कोणास वंदनीय वाटणार नाहींत! ज्या स्त्रीस अशा प्रकारचें खडतर वैराग्य नाहीं तिनें पुनर्विवाहही करावा, असाच एकंदर पूर्वापार संबंध पाहिला म्हणजे, आपणांस या श्लोकद्वयाचा अर्थ लावावा लागेल, याबद्दल विद्यासागरांनीं सर्वांची खात्री पटविली. निदान त्यांचें स्वतःचें समाधान तरी झालें.

विद्वान् व थोर टीकाकार माधवाचार्य यांनीं अशाच प्रकारची उपपत्ति दिली आहे. हेच श्लोक यत्किंचितही फरक न होतां नारदसंहितेंत पण आढळतात. तेथें तर पुनर्विवाह युक्त आहे असें सांगून नंतर वर सांगितलेल्या पांच आपत्तींसंबंधीं कांहीं नियमही दिले आहेत. उदाहरणार्थ, जर पति हरवला असला, तर ब्राह्मण स्त्रीनें ८ वर्षें वाट पाहावी, व पतिमार्गप्रतीक्षा करावी; त्या स्त्रीस मूलबाळ नसेल तर तिनें ४ च वर्षें वाट पाहावी. अशा प्रकारच्या नारदसंहितेंतील श्लोकांवरून तर सर्वच असंदिग्धता मावळते. पंच आपत्तींत सांपडलेल्या स्त्रीस पुनर्विवाह आहे आणि तो पुनः पूर्वी लग्न झालेल्या स्त्रीसच आहे. कारण लग्न झाल्याशिवाय मुलेंबाळें कशीं व्हावीं? वरील नारदसंहितेंत तर 'नष्ट' या पदाचा स्पष्टार्थ करितांना ८ वर्षें, मूल नसेल तर ४ वर्षें स्त्रीनें पतीच्या येण्याची वाट पाहावी असें स्वच्छ सांगितलें आहे. एकंदरींत काय तर जुनी शास्त्रीमंडळी सांगतात त्याप्रमाणें या वचनांचा अर्थ लागत नाहीं. बृहन्नारदीय व आदित्यपुराण यांत पुनर्विवाह स्पष्ट निषेधिला आहे, यांत शंका नाहीं. परंतु अशा मतभेदप्रकरणीं 'पुराणविरोधे स्मृतिप्रामाण्यं, स्मृतिविरोधे श्रुतिप्रामाण्यं' असा न्याय आहे. पाराशरसंहिता हा स्मृतिग्रंथ आहे, बृहन्नारदीय आणि आदित्यपुराण हे ग्रंथ पुराणांत मोडतात. यास्तव पाराशरसंहितेस प्राधान्य प्राप्त होतें.

न्यायतः, तर्कतः, सर्व जुन्या शास्त्रीमंडळींचीं तोंडें तर विद्यासागर यांनीं बंद पाडिलीं. परंतु ज्यांचा भर बुद्धियुक्त विवेचनावर नाहीं, तर्कप्राप्त व

न्यायप्राप्त सिद्धांतावर नाहीं, 'तर शेषं कोपेन पूरयेत्' या न्यायानें जे वैयक्तिक निंदा, क्रोधयुक्त मर्म-वचनप्रहार हींच ज्यांचीं शस्त्रें आहेत, हाच ज्यांचा आधार त्या लोकांचीं मनें संतुष्ट करावयाचीं कशीं ? त्या ज्ञानलवदुर्विदग्धांस, किंवा ज्ञानभरगर्वितांस शांत कसें करावयाचें हा प्रश्न आहेच. भल्यानें होतां होईतों त्यांच्या मार्गांत न जाणें हेंच श्रेयस्कर.

विधवापुनर्विवाहावर विद्यासागर यांनीं जे दोन ग्रंथ लिहिले, त्यामुळें सर्व बंगाली समाजांत फार खळबळ उडाली. हळूहळू सुधारणा होत असते; हळूहळू अंधकारपटल दूर होऊन दिशा उजळूं लागतात. विद्यासागर यांस कलकत्त्यांतील कांहीं वजनदार पुरुषांचा आधार मिळूं लागला; ते विद्यासागर यांच्या विचारसणीस उचलून धरूं लागले.

आपल्या बालविधवा कन्यकांचे पुनर्विवाह करण्यास पुष्कळ आईबाप तयार होऊं लागले. पुनर्विवाहास उचलून धरणाऱ्यांनीं, पुनर्विवाहाच्या कैवाऱ्यांनीं या कन्यकांस योग्य पति मिळवून देण्याची खटपट करणें अवश्य होतें. या गोष्टीच्या आधीं दुसरी एक महत्त्वाची गोष्ट करावयास पाहिजे होती. ती म्हणजे अशा पुनर्विवाहित स्त्रीपासून जी संतति होईल ती कायदेशीर व सशास्त्र मानली जावी. असा कायदा करणें म्हणजे जुन्या कायद्यांत फरक करणें. २५००० लोकांच्या सहीचा अर्ज विद्यासागर यांनीं सरकारकडे पाठविला. 'विधवाविवाह कायदेशीर समजला जावा व एतदर्थ सरकारनें कायदा करावा,' असें यांत मागणें केलें होतें. या सह्या मिळविण्यास विद्यासागर यांस किती कष्ट व दगदग पडली असेल याची आपणांस कल्पना होणार नाहीं. कारण जुन्या परंपरेनें, रूढीस अनुसरून वागणारे जेथें शेंकडा ९९॥। लोक तेथें २५,००० सह्या मिळविणें फार सुदुर्घट काम होतें. परंतु प्रयत्नांस काय अलभ्य आहे? प्रयत्नांतीं परमेश्वर मिळतो; प्रयत्नानें नराचा नारायण होतो; प्रयत्नानें सर्व साध्य होतें. श्रद्धा व निष्ठा ठेवून प्रयत्न करा कीं यशसिद्धि झालीच समजा.' बरद्वानचे महाराज यांनीं जेव्हां या पुनर्विवाहास संमति दिली, आणि विद्यासागर यांचे प्रयत्न प्रसंशिले, तेव्हां तर विद्यासागर यांस पराकाष्ठेचा आनंद झाला. आनंदास आकाश ठगणें झालें. विद्यासागर यांनीं ऑनरेबल जे. पी. ग्रँट यास एक पत्र लिहिलें व त्या पत्रांत त्यांनीं आपला आनंद व्यक्त केला आहे.

शेंवटीं विधवापुनर्विवाह कलम तर मंजूर झालें. सरकारनें त्यासाठीं नवीन

कायदा केला. ज्या वेळेस हें बिल पास झालें, त्या वेळेस जीं भाषणें झालीं तीं फार मनोरंजक आहेत. ती माहिती मोठी मौजेची आहे. जे. पी. ग्रँट यांनीं हें बिल सर्व सभासदांपुढें मांडलें. त्यांचें भाषण फार सुंदर व समर्पक होतें. विद्यासागरांच्या श्रमांचे त्यांनीं गोडवे गाइले व असे श्रम फुकट जाऊं देणें म्हणजे एक प्रकारचें पातकच असें ते म्हणाले.

रघुनंदन जो बंगाली लोकांस धर्मशास्त्र सांगणारा, त्याच्या पूर्वीच्या व्यवस्थेचें स्वरूप सांगून हा कायदा पास होणें किती जरूर आहे याचें ग्रँट-साहेबांनीं विवेचन केलें. ते म्हणतात, " If he knew certainly that but one little girl would be saved from the horrors of Brahmacharya by the passing of this Act, he would pass it for her sake, if he believed, as firmly as he believed the contrary, that the Act would be wholly a dead letter if he would pass it for the sake of the English name."

" एकाही मुलीस ब्रह्मचर्याच्या अघोरपणापासून व तीव्र यातनांपासून मला मुक्त करण्याचें श्रेय मिळेल, तरी मी हा कायदा पास करण्यास तयार आहें. जरी हा कायदा निरुपयोगी राहील, तरी इंग्लिश लोकांनीं मनाचा उदारपणा दाखविला हें दर्शविण्यासाठीं तरी हा मंजूर करणें इष्ट व आवश्यक आहे."

विद्यासागरांच्या धुरीणत्वाखालीं, त्यांच्या नेतृत्वाखालीं आतां विधवा-पुनर्विवाह होऊं लागले. पहिला विवाह, एका कुलीन व बाळबोध घराण्यांतील ब्राह्मण युवा व एक १० वर्षांची बालविधवा यांचा झाला. विद्यासागर आतां तनमनधनेंकरून या चळवळींत पडले. लोकांत ही चळवळ दृढमूल जेणेंकरून होईल, त्या गोष्टींचा त्यांस ध्यास लागला. त्यांचें जीवनतत्त्व एकच होऊन राहिलें; एकमेव ध्येय डोळ्यांस दिसूं लागलें, त्यांच्या मनास रिझवूं लागलें. तें म्हणजे विधवांची विपन्नावस्था दूर करणें. ज्यांनीं पुनर्विवाह केले त्या कुटुंबांस जर बहिष्कृत करण्यांत आलें, तर त्यांस त्रास व क्लेश होऊं नयेत, एतदर्थ विद्यासागर पैसे वगैरे पुरवीत; व या नूतन परिणीत जोडप्यास सर्व सोयरेधायऱ्यांस, स्नेहीसंबंधी लोकांस मिष्टान्नाचें भोजन देण्यास सांगत. या योगें स्नेही वगैरे संतुष्ट होऊन त्यांचीं मनें थोडींफार कमी कलुषित होत. कधीं कधीं अशा प्रकारें नवीन विवाहबद्ध झालेल्या दांप-

त्यास घरादारांस मुकावें लागे; त्यांस घरीं थारासुद्धां मिळत नसे. अशांचा तर भार सर्वस्वीं विद्यासागर यांच्यावर पडे.

या सर्व गोष्टींसाठीं पुष्कळ पैशाची जरूर होती. विद्यासागर यांनीं 'विधवा पुनर्विवाहनिधि' स्थापन केला. प्रथम प्रथम या निधीस पुष्कळ श्रीमंत लोक मासिक वर्गणी पाठवीत. परंतु कालक्रमानें हा इतर जनांचा उत्साह ओसरला; दिलेलीं वर्गणीचीं वचनें अपुरीं राहूं लागलीं; शब्द सुके व कोरडे राहिले. 'वचने किं दरिद्रता' या म्हणण्याप्रमाणें शाब्दिक व तोंड-देखली सहानुभूति भरपूर, परंतु खरें साहाय्य मिळेनासें झालें. या श्रीमंतांच्या व इतर लोकांच्या वचनांवर विसंबून विद्यासागर यांनीं किती तरी कर्ज काढलें होतें. आणि हें कर्ज आतां फेडावयाचें कसें? वचन देणारे विसरले; ज्या-प्रमाणें पूर्वीं यंगसाहेबांनीं फसविलें, त्याप्रमाणें आतां ईश्वरचंद्रांस त्यांच्याच देशबांधवांनीं फशीं पाडिलें.

सावकारांचा ससेमिरा लागलेला; वर्गणी तर मिळत नाहीं. संकटें दुर्लंघ्य व दुस्तर दिसूं लागलीं. आपल्या देशबांधवांचा विश्वासघातकीपणा पाहून विद्यासागर दुःखीकष्टी झाले, त्यांस पराकाष्ठेचें वाईट वाटलें, मग व्यग्र झालें, हृदय जळूं लागलें. विधवाविवाहाच्या खर्चाची रक्कम तर सारखी फुगत चालली होती. तीस आळा घालतां येत नव्हता. कारण असे विवाह जितके होतील, तितके विद्यासागर यांस पाहिजे होते. एक विधवाविवाह म्हणजे त्यांस मोक्ष-प्राप्तीचा आनंद होई. त्यांची ही पुनर्विवाहाची तळमळ इतकी तीव्र होती कीं, ते म्हणत, 'मीं मरून जावें व माझ्या पत्नीनें पुनर्विवाह करून लोकांस उदाहरण घालून द्यावें.' आपल्या ध्येयसिध्यर्थ स्वतःच्या जीवितावरही तिलां-जली वाहूं पाहणारा पुरुष थोर व धन्य नाहीं का? ग्रीस देशांतील प्रख्यात कायदे करणारा लायकर्गस यानें सुद्धां आपले प्राण, कायदे सुरक्षित राहावेत, पाळले जावेत व देशसमृद्धि व्हावी, म्हणून दिले होते. त्याची आठवण आम्हांस या प्रसंगीं होणें अपरिहार्य आहे. असो. विद्यासागरांनीं अनेक मित्रांकडून कर्जाऊ रकमा घेतल्या होत्या. कर्ज वाढत चाललें याची त्यांस फिकीर नव्हती. मनुष्य एखाद्या उदात्त तत्त्वानें वेडा झाला म्हणजे त्यास मग इतर गोष्टींचें भान रहात नाहीं. इतर गोष्टी त्यास ग्रासूं शकत नाहींत. सर्व संकटें, कष्ट, दुःख, निराशा यांस बाजूस सारून तो ध्येयार्थ धडपडत असतो. ईश्वरचंद्र अशाच वेड्यापीरांपैकीं होते. सर्व थोर लोक असेच वेडे असतात. All great men are mad with some idea.

कर्ज कसें वारावें याचा मार्ग दिसेना, उपाय सुचेना; अन्नपाणी रुचेना. सुरेंद्रनाथ बानर्जी यांचे वडील ईश्वरचंद्रांचे मोठे मित्र. यांनीं पण ईश्वरचंद्रास कांहीं द्रव्य साहाय्य केलें होतें, परंतु त्यांस पैशाची फार निकड होती आणि म्हणून त्यांनीं ईश्वरचंद्रांजवळ आपले पैसे तांतडीनें परत मागितले. विद्यासागर यांनीं सुरेंद्रनाथ बानर्जींच्या वडिलांस जें पत्र लिहिलें, त्यांतील कांहीं भागाचा मतितार्थ खालीं देतों.

"गेले कांहीं दिवस कर्जमुक्त होण्यासाठीं मी सतत धडपड करितों आहें, परंतु काय—कोणताही उपाय दिसत नाहीं. सर्व प्रयत्न हरले; सर्व उपाय थकले. आपले पैसे परत करण्यासाठीं मीं जिवाचें रान केलें, परंतु सर्व व्यर्थ.

आपणापासून मीं पैसे घेतले, ते माझें स्वतःचें पोट जाळण्यासाठीं, किंवा कांहीं वैयक्तिक स्वार्थासाठीं खास घेतले नव्हते. विधवापुनर्विवाहाचा जो निधि असतो, त्यासाठीं जो खर्च होतो, त्यासाठीं मीं पैसे आपणांपासून कर्जाऊ घेतले, तसेंच अन्यत्रांपासूनही घेतले आहेत. जे पैसे मीं उसनवार घेतले, ते पैसे, मला ज्या वर्गण्या देण्याचें कित्येकांनीं वचन दिलें, त्या वर्गण्या मिळाल्यावर मी फेडून टाकणार होतों. परंतु देऊं केलेल्या या वर्गण्या अद्याप हातीं आल्या नाहींत. खर्च तर रोज वाढत आहे आणि उत्पन्न मात्र शून्य आहे.

आतां माझा सर्वस्वीं नाश झाला आहे. आपणसुद्धां इतरांप्रमाणें मासिक वर्गणी देण्याचें व एक भली मोठी देणगी देण्याचें कबूल केलें होतें, तें आपणांस स्मरत असेलच. परंतु आपण वर्गणी देण्याचें तर बंदच केलें आहे आणि जी देणगी देणार होतां, त्यांतील निम्मी मात्र दिलीत. आपल्या ऋणांतून मुक्त होण्यासाठीं मी रात्रंदिवस काबाडकष्ट करीन; कोणताही प्रयत्न बाकी ठेवणार नाहीं; ज्या वेळेस पैशाची आपणांस अत्यंत निकड आहे, अशा प्रसंगीं आपणांस पैसे मला देतां येत नाहीं याबद्दल मी असहाय आहें; मी दिलगीर आहें, दुःखीकष्टी आहें. माझे देशबांधव असे क्षुद्र मनाचे व विश्वासघातकी आहेत हें मला आधींच कळून येतें तर असल्या खटाटोपांत मी पडलोंच नसतों. नसती जबाबदारी शिरावर घेतली नसती. पैशाची मदत तर दूरच राहिली, परंतु फुकाचे शब्दानें सुध्दां कोणी या चळवळीची हालहवाल विचारीत नाहीं; वास्तपुस्त घेत नाहीं." अशा प्रकारचें करुणरसपूर्ण पत्र

विद्यासागर यांस लिहावयास लागावें, अशा तत्त्वनिष्ठ, स्वार्थत्यागी, मानधन पुरुषवरावर असा प्रसंग यावा, याहून खडतर दैवदुर्विलास दुसरा कोणता ?

दुसऱ्या एका गृहस्थानें " मीं वर्गणी देण्याचें कबूल केलें होतें; त्याचप्रमाणें देणगीही देण्याचें कबूल केलें होतें, परंतु माझ्या भावाचा या गोष्टीस फार विरोध आहे. तो म्हणतो, ' पुनर्विवाहनिधीस दिलेले पैसे कधीं मिळणार नाहींत; आणि ही चळवळ लवकरच मरणार. ' माझी पैसे देण्याची अत्यंत इच्छा आहे परंतु काय करणार ? भावाचें मन मोडवत नाहीं, " असें विद्यासागर यांस लिहिलें. विद्यासागरांनीं या पत्रलेखकास लिहिलें, " आपलें पत्र फार उशिरां आलें. यापूर्वींच जर आपण आपला नकार दिला असतां तर जें काम मीं माझ्या शिरावर आज घेतलें आहे, तें घेतलें नसतें. परंतु आतां तरी कळवून मला सावध केलेंत याबद्दल मी आपला ऋणी आहें."

किती संकटें आलीं, तरी त्यांचाही केव्हां तरी अंत होतो. अमावास्येची रात्र सुध्दां जावयाची असते. काळ्याकुट्ट ढगांतूनही वीज चमकते; किंवा त्यांच्या कडा सोनेरी रंगानें भूषित दिसतात. ईश्वरचंद्रांसही धीर देणारे थोडेफार खऱ्या भावाचे स्नेही होते. जिवश्चकंठश्च मित्र केव्हांही थोडेच असणार. या आपत्कालीं विद्यासागर यांस राजनारायण बोस ( अरविंदांचे मातामह ) हे नेहमीं मदत करीत. राजनारायण बोस हे अत्यंत निर्मळ व पवित्र आचरणाचे. त्यांचें हृदय सात्त्विक व प्रेमळ होतें. जरी ते ब्राह्म होते, तरी ब्राह्म मंडळींत हिंदु संस्कृतीचा पूर्ण अभिमान बाळगणारे राजनारायणच फक्त होते. सुरेंद्रनाथांनीं आपल्या जीवनस्मृतींत राजनारायण यांस ' Saintly ' संत असें विशेषण जोडलें आहे. हिंदुसंस्कृतीचें वैशिष्टय प्रतिपादण्याकरितां राजनारायण यांनीं अनेक निबंध लिहिले. अशा साधुतुल्य राजनारायणांनीं परोपकाररत विद्यासागरांस साहाय्य करावयाचें नाहीं तर कोणीं करावयाचें ?

परंतु राजनारायण यांनीं मदत दिली तरी ती खिंडींत रतीप्रमाणें होती, सिंधूंत बिंदुसदृश होती. डोंगरास दुखणें आणि शिंपींत औषध तद्वत् हें होतें. आकाश फाटलें तेथें या ठिगळांनीं काय होणार ? हतबुद्ध होऊन ईश्वरचंद्र बसले होते. या सुमारास बंगालमध्यें नवीन लेफ्टनंट गव्हर्नर सर सेसिल बीडन हे आले होते. विद्यासागरांबद्दल साहेबमजकुरांनीं ऐकलें होतें. त्यांची व विद्यासागरांची मुलाखत झाली. विद्यासागरांची विपन्नावस्था पाहून बीडन बोलले, ' आपण सरकारी नौकरी करावयास तयार आहांत काय ?

निजदेशबांधवांवरचा विश्वास समूळ मावळला नसल्यामुळें, मानधन विद्यासागर यांनीं त्या पहिल्या मुलाखतींत नकार दिला. परंतु आतां प्रसंग विकट आला. सरकारी नोकरी नीट मिळाली तर पाहावी असा विद्यासागर यांनीं विचार केला. त्यांनीं बीडनसाहेबांस तदर्थी लिहिलें. "सध्या नौकरी शिल्लक नाहीं म्हणून दिलगीर आहें; परंतु आपलें नांव स्मरणांत ठेविलें आहे. आपल्यास योग्य अशी जागा रिकामी होतांच कळवीन," अशा मजकुराचें विद्यासागर यांचे पत्राचें उत्तर गव्हर्नरसाहेबांनीं धाडलें. पुढें तीन वर्षांनीं प्रेसिडेन्सी महाविद्यालयांत संस्कृताध्यापकाची एक जागा रिकामी झाली होती. विद्यासागर यांनीं ही जागा आपणांस मिळावी म्हणून अर्ज केला, परंतु त्या अर्जांत नोकरी मिळण्याबाबत त्यांनीं कांहीं अटी घातल्या होत्या. त्यांतील मुख्य व मुद्याची म्हणजे 'युरोपीय प्रोफेसरांस जितका तनखा मिळतो, तितका मलाही मिळावा. त्यांच्या जोडीचा, तोलाचा मी समजला गेलों पाहिजे.' अशी अट विद्यासागर यांनीं घातली. लेफ्टनंट गव्हर्नर यांनीं 'एवढ्या मोठ्या पगाराची जागा, संस्कृत महाविद्यालय निराळें असतांही, प्रेसिडेन्सी कॉलेजमध्यें संस्कृताध्यापकास देण्यांत येईल कीं काय, याची मी प्रेसिडेन्सी कॉलेजच्या प्रिन्सिपालजवळ चवकशी करून काय तें कळवितों,' असें उत्तर विद्यासागर यांस धाडलें. अर्थातच युरोपीय लोकांप्रमाणें मोठा पगार देऊन विद्यासागरासारख्या पंडित-रत्नास घेण्यास हीं प्रेसिडेन्सी कॉलेजमधील मर्कटें तयार झालीं नाहींत. विद्यासागर हे विद्येचे सागर होते तरी ते रंगानें काळे होते ना? हृदय विद्येनें निर्मळ व शुद्ध असलें तरी आमचें सरकार बाह्यरंग पाहून भुलतें व खुलतें, त्यास काय उपाय?

मित्र, स्नेही-संबंधी, सरकार, सर्वांच्या बाबतींत आतां निराशा झाली होती. या सुमारास ईश्वरचंद्रांचा एकुलता एक मुलगा 'नारायण विद्यारत्न' हा पुनर्विवाह करण्यास तयार झाला. निराशेंतही विद्यासागर यांस आशा आली. दुःखांतही त्यांच्या सुकून गेलेल्या मनोवृत्ति-वल्लीस सुखाचे पल्लव फुटले. त्यांनीं आपल्या मुलास उत्तेजन दिलें. परंतु आतां सख्खे भाऊ विरोध करावयास व दुःख द्यावयास आले. ईश्वरचंद्राचा पाठचा भाऊ हा न्यायाधीश-पंडित होता. त्यांस चांगला पगार मिळे. दुसरा एक धाकटा भाऊ होता. त्यांचें नांव शंभुचंद्र न्यायरत्न. या सर्व भावांस विद्यासागरांनीं शिकविलें; लहानाचे मोठे केलें; जगांत अन्नास लाविलें. विद्यासागरांच्या हातांनीं वाढलेलीं हीं झाडें शीतल

छाया देण्याऐवजीं, मार्गांत कांटे पसरणारीं निपजलीं. विद्यासागरांचें दुर्दैव दुसरें काय ? प्रथम या शंभुचंद्रांनीं या पुनर्विवाहास जोराचा पाठिंबा दिला. प्रथम उत्तेजन देणारा भाऊ, प्रत्यक्ष विवाह आतां उद्यां होणार असें पाहातांच उलटला. 'आपणांस आपले इतर गणगोत, आप्त बहिष्कृत करूं पाहात आहेत, तर आपण हा नियोजित विवाह घडवून आणूं नये. मोठ्या भावाचें असेंच मत आहे', वगैरे ईश्वरचंद्रांस त्यानें लिहिलें. हा शंभुचंद्र दुतोंड्या होता. ईश्वरचंद्रांस तोंडावर वानील, तर तिकडे न्यायाधीश भावाजवळ ईश्वरचंद्रांस निंदील. असले दुधारी बाण फार वाईट. आंत एक वर एक असें करणारे दुष्ट लोक फार भयंकर. शंभुचंद्रानें अशा प्रकारें भीति घातली, आणि आयत्या वेळीं समारंभावर विरजण घालण्याचा प्रयत्न केला, तरी अशानें निश्चित कर्मापासून परावृत्त होणारे विद्यासागर नव्हते. त्यांनीं धीर सोडला नाहीं; पुत्राचा पुनर्विवाह तर केला, मेजवानी वगैरे दिली. त्या वेळेस मग शंभुचंद्र म्हणतात, 'आपण कसोटीस उतरलां. आपल्या धैर्याची परीक्षा पाहण्यासाठीं मीं पत्र लिहिलें; नाहीं तर मला तसें करावयाची तादृश जरूर नव्हती. मोठा भाऊ विरोधी असला, तरी माझें मन पहिल्यापासून ह्या विवाहास अनुकूल होतें.' वाहवारे भल्या गृहस्था! विद्यासागरांच्या धैर्यमेरूची परीक्षा पाहणारा कोण, तर तूं क्षुंगुरडें, क्षुद्र जंतु, दुर्बल जीव! सूर्याची तेजःपरीक्षा खद्योतानें पाहण्यापरी हें हास्यास्पद होतें. विद्यासागरांनीं आपल्या भावास लिहिलेल्या उत्तरांत त्यांचा धीर आपणांस दिसतो. "या चळवळीमुळें मी सारखा खड्डयांत येतों आहें; संकटांत पडतों आहें. परंतु या ध्येयार्थ प्राणांवर पाणी सोडण्यासही मी तयार आहें हें लक्षांत धरा." खरा वीर पुरुष! अशाच थोर पुरुषांकडून ईश्वराचें वैभव जगास आविर्भूत झालेलें दिसून येतें.

विद्यासागर यांची चळवळ यशस्वी झाली नाहीं. एकदां बंगाली वृत्तपत्रांत सुरेंद्रनाथ यांनीं विधवेशीं विवाह करण्यास तयार अशा तरुणांचीं नांवें मागितलीं होतीं. त्यावरून १७० तरुणांनीं नांवें कळविलीं. यांत शास्त्री-पंडितही होते. परंतु यावरून ही चळवळ फार दृढमूल झाली असें समजतां येत नाहीं. आयत्या वेळीं पुष्कळ लोक हातपाय गाळतात. पुनः एक विद्यासागरांचा अवतार झाला पाहिजे. एकेक सुधारणा नांवारूपास येण्यास त्या त्या सुधारणेसाठीं सर्वस्व वाहणाऱ्या लोकांचे शतशः अवतार होतील तेव्हां हा सुस्त हिंदुस्थान हलूं लागेल, एरवी नाहीं. कोणत्याही सुधारणा हळुहळू होतात.

निसर्गाचें काम आंतून चाललें असतें, तें अदृश्य असतें, हें सर्व खरें; तरी पण कार्यकर्ता या गोगलगायीगतीनें उदासीन होतो यांत संशय नाहीं. ईश्वरचंद्र यांस प्रथम विश्वास वाटे कीं, या शास्त्रीमंडळींस शास्त्राधारें पुनर्विवाह पटवून दिला म्हणजे काम होईल. शास्त्रांवर हिंदुमात्राची भक्ति आहे, शास्त्रांत सांगितलेली कोणतीहीं गोष्ट हिंदुमात्र करावयास तयार होईल, असा त्यांचा प्रथम समज होता. म्हणून त्यांनीं शास्त्रसागर धुंडाळला व मोतीं जनतेस सादर केलीं. परंतु समज चुकीचा ठरला. शास्त्राचे अनुयायी नसून हिंदु हे रूढीचे अनुयायी आहेत हें कठोर व भीषण सत्य विद्यासागरांस कळून आलें. उद्वेगाच्या भरांत विद्यासागर उद्गारले "हे भारतवर्षांतील स्त्रियांनो, असें काय पूर्वजन्मीं तुम्हीं पातक केलें होतें कीं, तुम्हांस या भारतभूमींत जन्म घ्यावा लागला ? मला तर कांहीं समजत नाहीं." पुन्हां एकदां ते अशाच खिन्नकारक प्रसंगीं म्हणाले, 'हे रूढीदेवते, तूं धन्य आहेस. तूं आपल्या भक्तास पूर्णपणें वश करून ठेविलें आहेस. या लोकांचीं जीवनें सर्वस्वीं तुझ्या हातीं आहेत; दास्याच्या जड शृंखलांनीं तूं त्यांस आपलें कायमचे गुलाम केलें आहेस. तूं धन्य आहेस."

विधवांचे अश्रु पुसावयास विद्यासागर यांनीं जन्म घालविला. हें करीत असतां खडतर कष्ट, कटु अनुभव, मित्रांचे वियोग, भावांचे शिव्याशाप त्यांस सोसावे लागले. आजही विधवांच्या हालअपेष्टा संपल्या नाहींत. तीच परिस्थिति आजही आहे. भारतवर्ष इतकें उदासीन कसें एवढेंच फार तर आपण म्हणूं. परंतु सज्जनांनीं सोसलेले कष्ट, आपदा, या व्यर्थ ठरत नसतात. येशू खिस्तानें जीव दिला आणि नंतर कांहीं शतकांनीं सर्व युरोप त्यास देव मानूं लागलें. सृष्टीचे व्यवहार चुटकीसरसे होत नाहींत. अनेक थोर पुरुषांना कष्टावें लागतें, तेव्हां सृष्टिदेवता सुंदर फळ अर्पण करिते. म्हणून विद्यासागर यांचे प्रयत्न फुकटच गेले असें संकुचित--दृष्टि मानवांनीं तरी म्हणूं नये.

विधवा–विवाहाशिवाय अन्य सुधारणांशींही विद्यासागर यांचा संबंध होता. बहुविवाहास आळा घालण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. एका पुरुषानें अनेक बायका कराव्या हें तत्त्व त्यांस फार किळसवाणें व अन्याय्य वाटे. बंगालमधील फार उच्चवर्णीय ब्राम्हणांत ही चाल विशेष प्रचारांत होती. या ब्राम्हणांस कुलीन असें म्हणत. एकेक कुलीन ब्राम्हण १२ ते ३० बायकाही करी. कधी कधीं ही संख्या ह्याच्या दुप्पटही होत असे. स्त्रियांस पुष्कळ वेळां स्वपति-

मुखावलोकन आयुष्यांत एखाद्या वेळींच घडावें असा प्रसंग येई. एका १२ वर्षांच्या मुलास दोन बायका करून दिल्या; आणखी किती देतील याला सीमाच नसे. हें सर्व पाहून विद्यासागर यांचें पित्त खवळे. 'बहुविवाह' या आपल्या पुस्तकांत त्यांनीं या पद्धतीची नुसती रेवडी उडविली आहे. अत्यंत कठोर व सणसणीत टीका त्यांनीं या चालीवर केली. ही चाल पडण्याचें कारण असें कीं, कुलीन ब्राम्हणांत जे पुनः 'मेल' असत, म्हणजे संघ असत, त्यांच्यांतही एकमेकांत लग्न होत नसे. एका 'मेलांतील' ब्राम्हणांनीं त्याच मेलांतील स्त्रियांशीं विवाह केले पाहिजेत. या कुलीन ब्राम्हणांत त्या काळीं मुलांपेक्षां मुलींची संख्या फार असे, आणि त्यांतच हे 'मेल' असत. त्यामुळें एकेका मुलास १० - १२ बायका वराव्या लागत. ईश्वरचंद्रांनीं अगदीं कमींत कमी उपाय सुचविला तो हा कीं, निदान सर्व कुलीनांनीं तरी एक व्हावें. आणि हीं मेलबंधनें नाहींशीं करावीं. परंतु ईश्वरचंद्रांचे सर्व प्रयत्न अनाठायीं गेले. त्यांचा उपदेश उपड्या घड्यावर पाणी ओतण्याप्रमाणें व्यर्थ गेला. लोक ऐकत नाहींत तर कायद्याची कांस करून त्यांस वठणीवर आणावें असा विद्यासागर यांनीं विचार केला. २१००० लोकांच्या सह्या घेऊन हा बहुविवाह कायद्यानें रद्द करावा अशी मागणी करणारा अर्ज त्यांनीं सरकारास सादर केला. बंगालचे जे गव्हर्नर त्यांस सहानुभूति वाटत होती. परंतु त्यांस या प्रकरणांत कांहीं करतां येत नव्हतें. यापूर्वीं विधवाविवाह कायदेशीर मानावा म्हणून एक कायदा झालाच होता. १८५७ सालच्या बंडास जीं अनेक कारणें होतीं त्यांत हा विधवाविवाह कायदासुद्धां कोणी अंतर्भूत करितात. १८५७ पासून सरकारनें कानास खडा लाविला कीं, अतःपर लोकांच्या धार्मिक आचारविचारांत आपण मुळींच हात घालवयाचा नाहीं. नुकतेंच बंड होऊन गेलेलें. यासाठीं गव्हर्नर म्हणाले, "तुमच्या चळवळीबद्दल मला सहानुभूति वाटते, परंतु माफ करा, या बाबतींत सरकार हात घालूं इच्छित नाहीं." बंगाल सरकारनें असा कानावर हात ठेवलेला पाहून ईश्वरचंद्र हतबुद्ध झाले. विलायतेस जावें आणि पार्लमेंटच्या सभासदांची सहानुभूति संपादून हा बहुविवाह रद्द करण्याचा कायदा पार्लमेंटमधून पास करावा असेंही त्यांनीं मनांत योजिलें होतें. परंतु अशक्त होणारी प्रकृति, पैशाची टंचाई व आणखी पुष्कळशा इतर गोष्टींमुळें जाणें लांबणीवर पडत चाललें व तें कायमचेंच लांबलें. एकंदरींत या बाबतींतही ईश्वरचंद्र यांस यश आलें नाहीं.

वरील चळवळीप्रमाणें दुसरी मोठी चळवळ विद्यासागर यांनीं करण्यास मदत केली, ती मद्यपानप्रतिबंधाची चळवळ. ही चळवळ प्यारीचरण सरकार यांनीं खरोखर प्रथम सुरू केली. प्यारीचरण सरकार हे कोलूटोला ब्रँच शाळेचे हेडमास्तर होते. हे फार थोर गृहस्थ होते. सुरेंद्रनाथ आपल्या जीवनस्मृतींत लिहितात, "I never had the honour of sitting at the feet of Peary Churan Sircar, but he was one of the greatest teachers of youth that Bengal had produced." "प्यारीचरण सरकार यांच्या पदसरोजाजवळ बसण्याचें माझें भाग्य नव्हतें; परंतु त्यांच्यासारखा तरुणांचा शिक्षक, व मार्गदर्शक बंगालमध्यें आजपर्यंत कोणी झाला नाहीं." अशा प्यारीचरणांनीं ही मद्यपानचळवळ हाणून पाडण्याचें करीं कंकण बांधलें. इंग्रजी शिक्षणाबरोबर जे कांहीं दोष आपणांत शिरले, जीं व्यसनें आपणांस खालीं चिखलांत ओढूं लागली, त्यांत हें मद्यपान एक होतें. आपल्या महाराष्ट्रांतही नवसुशिक्षित लोकांत हें मद्यपान फार बोकाळलें होतें. पुण्यांतील एक प्रख्यात इंग्रजी शिक्षक गटारांत दारू पिऊन धुंद झालेले असावयाचे. त्यांस कोठून तरी हुडकून शाळेंत आणावें लागे, एकदां शाळेंत आले, म्हणजे मग मात्र हे उत्कृष्ट शिकवावयाचे.

बंगालमध्यें तर यापेक्षां मोठे प्रकार होते. मद्यमांस, गोमांससुद्धां हे नव-सुशिक्षित सेवन करीत. बंगालचे प्रख्यात राष्ट्रीय कवि, 'मेघनादवध' हें अप्रतिम महाकाव्य लिहणारे मायकेल मधुसूदन दत्त हे दारू पिऊन कसे झिंगलेले असत, व इह–लौकिकं–विचार-विस्मृति कशी करून घेत तें सुप्रसिद्ध आहे. इंग्रजी शिकलें म्हणजे तदनुषंगिक या सर्व गोष्टी आपणांस प्राप्त करून घेतल्याच पाहिजेत असें त्या वेळेस सर्वांस वाटे. जो मद्यास सेवन करणार नाहीं, जो धूम्रपान करणार नाहीं तो खरा शिकलाच नाहीं, त्याच्यांत संस्कृति नाहीं, असें तत्कालीन विद्वान् खुशाल बिनदिक्कत समजत. मोठे मोठे लोक या व्यसनास बळी पडले होते. "Some of our best men had fallen victims to the curse of drink," असें सुरेंद्रनाथ लिहितात. या व्यसनाच्या मगरमिठीपासून बंगालला मुक्त करावें, तरुणांस ताळ्यावर आणावें, म्हणून प्यारीचरण बद्धपरिकर झाले.

प्यारीचरण यांची कृश व छोटी मूर्ति, प्यारीचरण यांचा गोड स्वभाव, त्यांची शांतता, गडबडगुंड्यापासून दूर असण्याची वृत्ति, हीं सर्व पाहून प्रथम

तर पुष्कळांस असें वाटलें कीं, या शांत मूर्तीच्या हातून हें धडाडीचें धकाधकीच्या मामल्याचें काम कसें व्हावें? पाठशाळेंत शांतपणें विचारामृत पाजणारा, आपल्या खोलींत गहन गोष्टींचें चिंतन करणारा हा साधा पुरुष, समाजांतील व्यसनास आळा घालण्याचें काम कसें करणार? परंतु लवकरच लोकांचे वरील समज गैरसमज ठरले. या वामनमूर्तीचा पराक्रम मोठा आहे; मृदु व शांत अशा अंतरंगांत निश्चयाची तीव्रता, ध्येयार्थ प्रयत्न करण्याची व तदर्थ कष्ट सोसण्याची अपूर्व तयारी, हीं आहेत हें लोकांस दिसून आलें. आधींच प्यारीमोहन तरुणांचे प्राण. तरुणांची भक्ति व प्रेम प्यारीमोहन यांवर निस्सीम होती. असा सर्व तरुणांनीं पूजिलेला पुरुष या चळवळीस आरंभ करता झाला. सुरेंद्रनाथ लिहितात, "No man was better qualified to lead the movement than a teacher of youth so universally respected as Peary Churan Sircar. The outward look and demeanour of the man would, however, produce the impression that he was far more fit to follow than to lead. One so gentle, so quiet so amiable seemed to be hopelessly wanting in the sterner qualities of the leader of great public movement. The result, however, showed that there was the mailed fist concealed under the velvet glove, and that the gentle head master of the Calootota Branch School had been gifted by nature with what are believed to be incompatible qualities, a child-like simplicity and fascinating amiability, combined with the firmness and strength of a leader of men."

प्यारीचरण यांनीं सुरू केलेल्या चळवळीस चांगलें यश आलें. ईश्वरचंद्र या चळवळींत मोठ्या उत्साहानें मिसळले. जेथें म्हणून दुःख व कष्ट आहेत तेथें विद्यासागर जावयाचे. जेथें अन्याय आणि पाप होंत आहे, तेथें तें नाहींसें करावयास ते पुढें यावयाचे. केशवचंद्रसेन हा प्रख्यात धर्मोपदेशक व अप्रतिम वक्ता या चळवळींत सामील झाला. या चळवळीसाठीं कलकत्त्यास जी प्रचंड जाहीर सभा भरली होती, त्याच सभेंत पहिलें सार्वजनिक

भाषण करून सरकारनें हुसकून लावलेले सुरेंद्रनाथ बानर्जी जनमनांचे राजे झाले. अशा थोर पुरुषांनीं, कार्यतत्परांनीं जी चळवळ केली तिला यश कसें येणार नाहीं? त्या चळवळीस यश आलें. तरुण पिढीवर या चळवळीचा चांगला परिणाम घडला. मद्यपानाच्या लाटेस आळा बसला. तिचें भेसूर व प्रचंड स्वरूप कमी झालें. सुशिक्षितांत तरी हें व्यसन कमी झालें यांत शंका नाहीं.

वरील हकीगतीवरून ईश्वरचंद्र सामाजिक गाऱ्हाणीं, व सामाजिक अन्याय दूर करण्यासाठीं कसे झगडले तें समजेल. ज्ञानाचे दरवाजे सर्व जातींस खुले करण्यासाठीं संस्कृत महाविद्यालयांत त्यांनीं कशी खटपट केली व ब्रह्मवृंदांस गप्प बसविलें हें मागें सांगितलेंच आहे. त्यांची तळमळ फार; प्रयत्न जोराचे आणि या सर्व गोष्टी हिंदुसमाजांत राहूनच त्यांनीं केल्या. ब्राह्मोप्रमाणें किंवा आपल्याकडील प्रार्थनासमाजांतील लोकांप्रमाणें जनतेशीं फटकून राहून सुधारणा करूं पाहणारे ते नव्हते. सुधारणा करणारानें लोकांतच राहून, त्यांचे शिव्याशाप वगैरे गोष्टींस न भितां काम केलें पाहिजे, हळूहळू पुढें सरकलें पाहिजे, हें ईश्वरचंद्रांनीं भारतास शिकविलें. सुधारणा करणारास पुन्हा पुन्हा निराश व्हावें लागेल; परंतु स्वतःचे अश्रु आपण पुसून, लोकांचे अश्रु पुसावयास सतत प्रयत्न करीत राहिलें पाहिजे हें विद्यासागर यांनीं दाखविलें.

प्रसिद्ध बंगाली पंडित, अर्थशास्त्रज्ञ व कादंबरीकार रमेशचंद्र यांनीं ईश्वरचंद्रांची सुधारणा करणारे ह्या नात्यानें फारच स्तुति केली. कोण करणार नाहीं? सर्व विश्व माना तुकवील अशीच त्यांची अभिनव कामगिरी आहे.

---

## प्रकरण १० वें

# विद्यासागर यांचें गृहजीवन व सार्वजनिक जीवन

विद्यासागर यांस एकंदर आणखी सहा भाऊ होते. त्यांचीं नांवें अनुक्रमें १ दीनबंधु, २ शंभुचंद्र, ३ हरचंद्र, ४ हरिश्चंद्र, ५ ईशानचंद्र, ६ भूतनाथ. एकंदर हे सात भाऊ. या भावांच्या नांवांवरून घराण्यांत शंकराची भक्ति असावी असें दिसतें. आणि ईश्वरचंद्र जन्मण्याच्या पूर्वीं त्यांचे जे सर्वत्र

हिंडणारे वनवासी आजोबा होते, त्यांनीं काशीस विश्वेश्वरांची आराधना केली होती.

या भावांपैकीं हरचंद्र, हरिश्चंद्र व भूतनाथ हे विद्यासागर हयात असतांच वारले; बाकीचे त्यांच्यानंतर वारले. हरचंद्र हा फार हुशार होता व तो विद्यासागर यांस फार आवडावयाचा. तो ज्या वेळेस मेला, त्या वेळेस ईश्वरचंद्र वेड्यासारखे झाले. कित्येक दिवस ते खिन्न व उदास असत. भूतनाथ हा अगदीं लहानपणींच वारला.

या भावांचा विद्याभ्यास ईश्वरचंद्रांनींच केला. दीनबंधु हे न्यायरत्न होऊन त्यांस जज्ज-पंडित ही जागा मिळाली. शंभुचंद्र हे विद्यारत्न होते. ते खेड्यांत गांवींच राहात असत. ईशानचंद्र हा आपला जरा सुस्त व ऐदी असा होता. त्यास विद्या वगैरे नसे. तोही खेड्यांतच राहात असे.

विद्यासागर यांचें लग्न १४ वर्षें संपून पंधरावें लागलें, त्या वेळेस झालें. त्यांच्या पत्नीचें नांव दीनमयी. त्यांच्या लग्नांतील गंमतीची गोष्ट आहे. नवरानवरी ज्या वेळेस लहान असतात, त्या वेळेस बायका नाना प्रकारच्या चेष्टा करतात. त्यांना 'एकी का बेकी' खेळ खेळावयास लावतात. आणखी कित्येक गोष्टी करितात. बंगालध्यें सुद्धां अशीच चाल आहे. विद्यासागर लहान म्हणजे पंधरा वर्षांचे होते. लग्न झाल्यावर बायकांनीं काय केलें, पुष्कळ मुली जमविल्या. त्यांत कांहीं फारच खट्याळ व व्रात्य होत्या. 'जमलेल्या मुलींतून आपली बायको शोधून काढा' असें स्त्रियांनीं ईश्वरचंद्रांस फर्माविलें. विद्यासागरांस आपली पत्नी ओळखतां येईना. कारण नुकतेंच थोड्या वेळांपूर्वीं लग्न झालेलें आणि त्या वेळेस त्यांनीं बायकोच्या तोंडाकडे सुद्धां पाहिलें नव्हतें. कारण, आतांप्रमाणें त्या वेळेस परिस्थिति नव्हती. त्या जमलेल्या मुलींपैकीं एक जरा फार बोलत होती व 'सांगाना लवकर, काढाना हुडकून' वगैरे बोलून चिडवीत होती. ती दिसावयास सुद्धां सुंदर, गोरीगोमटी होती. विद्यासागरांनीं तिचा हात जाऊन घट्ट धरला व म्हटलें 'हीच माझी बायको.' आतां काय करावयाचें ? इतर मुली म्हणाल्या 'अहो, ही तुमची बायको नव्हे; तिला सोडा.' तरी विद्यासागर हात सोडीनात. विद्यासागर शरीरानें धष्टपुष्ट होते. झालें, त्या मुलीच्या डोळ्यांतून गंगा-यमुना घळघळा वाहूं लागल्या तरी विद्यासागर हात सोडीनात. ते म्हणाले 'तर मग माझी बायको मला दाखवा म्हणजे माझी

खात्री पटेल कीं ही माझी बायको नव्हे.' शेवटीं त्यांची बायको जेव्हां त्यांस आणून दाखविण्यांत आली, तेव्हां त्या मुलीचा हात त्यांनीं सोडिला. असे ते हट्टी व करारी होते.

विद्यासागर मोठे पगारदार झाले तरी आपली पत्नी ते कलकत्त्यास नेहमीं ठेवीत नसत. मधून मधून तिला ते कलकत्त्यास आणीत. नाहीं तर आईची शुश्रूषा करावयास ते पत्नी तिकडेच ठेवीत. विद्यासागरांची आई म्हणजे एक रत्न होतें. ती जरी शिकली-सवरलेली नसली, तरी फार बहुश्रुत, चाणाक्ष व विचारी होती. तिची बुद्धि तीव्र व ती गंभीर विषयांतही चाले.

विद्यासागर यांचे एक हॅरिसनसाहेब म्हणून युरोपीयन मित्र होते. हे इन्कमटॅक्स ऑफिसर होते. हे आपल्या दौऱ्यावर असतां विद्यासागरांच्या गांवीं आले. विद्यासागरांच्या आईच्या मनांतून हॅरिसन साहेबांस जेवावयास बोलवावयाचें होतें. तिनें आपल्या मुलाकडून हॅरिसनसाहेबांस पत्र लिहविलें की, "महाशय, आपला मुक्काम येथून लवकरच हालणार आहे. तरी आपण एकदां आमच्याकडे भोजनास येऊन आम्हांस आनंदित कराल अशी आशा आहे." विद्यासागर सुद्धां कलकत्त्याहून या समारंभास आले. हॅरिसनसाहेब विजार नेसून खुरमांडी घालून जेवावयास बसले. भगवतीचे चारी मुलगे बाजूला उभे होते. माता भगवती वाढीत होती, गप्पा गोष्टी चालल्या होत्या. साहेब इंग्रजींत बोलत व तें भगवतीस बंगालींत विद्यासागर सांगत व आईचें म्हणणें साहेबांस इंग्रजी करून सांगत. मध्येंच साहेबांनीं भगवतीस विचारलें 'आपण इतक्या उदार आहांत तर आपल्या जवळ संपत्ति तरी किती आहे?' भगवती म्हणाली, 'आहेत चार रांजण द्रव्यानें भरलेले.' 'मला ते आपण दाखवाल का?' असें हॅरिसननीं विचारलें. 'हो, न दाखवावयास काय झालें' असें म्हणून भगवतीनें आपल्या सोन्यासारख्या चार मुलांकडे बोट केलें व म्हणाली, 'हा माझा जामदारखाना, ही माझी जिवंत संपत्ति.' भगवतीच्या भाषणानें हॅरिसन संतुष्ट झाले. जातांना ते भगवतीस म्हणाले, 'आपण जर चार उपदेशाच्या गोष्टी मला सांगाल तर त्याप्रमाणें वागण्याचा मी निश्चय करीन.' भगवती म्हणाली, 'मी जास्त काय सांगणार? मी बाई माणूस. परंतु आज तुमच्या हातांत सत्ता आहे; अधिकार आहे. अधिकाराबरोबर त्याचा सदुपयोग करण्याची जबाबदारी आपणावर येते हें विसरून चालणार नाहीं. कोणाचेंही नुकसान करूं नका; कोणाचा

तळतळाट माथीं घेऊं नका. आपल्या मागें प्रजेनें आपलें नांव काढावें, आपणास दुवा द्यावा अशा तऱ्हेचें वर्तन ठेवणें तुमचें कर्तव्य आहे.' अशा प्रकारचा मोलाचा उपदेश या साध्वीनें हॅरिसनसाहेबांस केला आणि या हॅरिसनसाहेबानें पण कोणाचें कधीं नुकसान केलें नाहीं. ज्यांस हॅरिसन माहीत आहे असे त्या गांवांतील लोक त्यांची अद्याप मोठ्या प्रेमानें आठवण काढतात.

एकदां या खेडेगावांत हडसन नांवाचा एक युरोपीयन फोटोग्राफर आला होता. हा फार उत्कृष्ट फोटो काढी. विद्यासागर यांस आपल्या मातापित्यांचा फोटो काढून घ्यावयाचा होता. ते त्या वेळेस तेथेंच होते. त्यांनीं आईस पुष्कळ आग्रह केला कीं फोटो काढावयास चल म्हणून. परंतु ती माऊली या गोष्टीस तयार होईना, विद्यासागर म्हणाले, "आई, तूं किती निष्ठुर आहेस, मला दर्शन देण्याची तुझी इच्छा नाहीं? मी तिकडे कलकत्त्यास असतों; तुझें हरघडी दर्शन मला तेथें कसें बरें घेतां येईल? मला तुझी आठवण येते परंतु प्रत्यक्ष मूर्ति समोर नसतेस. तुझा फोटो काढून घेतला, म्हणजे मी तो माझ्या खोलींत ठेवीन; म्हणजे तुझें पवित्र व स्फूर्तिदायी दर्शन सदोदित घडेल." मुलाच्या या बोलण्याचा योग्य तो परिणाम झाला. परंतु हडसनसाहेबांच्या फोटो काढण्याच्या ठिकाणीं ती गेली नाहीं, हडसन इकडे आले व त्यांनीं उभयतां विद्यासागरांच्या आईबापांचा फोटो काढला. विद्यासागर या फोटोस प्राणांपलीकडे जपत. ते रोज सकाळीं या फोटोस वंदन केल्याविना थेंबभर पाणीसुद्धां प्राशन करीत नसत. आईबापच त्यांचें दैवत होतें. त्या दैवताची त्यांनीं आजन्म आमरण आराधना केली. तें प्रतिपुंडलीक होते.

संतोषानें संसार चालला होता. विद्यासागर यांनीं आपल्या खेडेगांवांत एक सुंदर बंगला बांधला होता. या बंगल्याच्या भिंती बांबूच्या होत्या. या भिंती करण्यास फार खर्च पडतो. बंगला सुंदर व खरोखर नमुनेदार होता. येथें विद्यासागरांचे आईबाप, त्यांची पत्नी, इतर भाऊ, त्यांच्या बायका राहात असत. विद्यासागर यांचा मुलगा नारायण येथेंच शंभुचंद्रांच्या तालमींत तयार होत होता. असें सुरळीत चालू असतां विद्यासागर यांचे वडील ठाकुरदास यांनीं एकदम काशीस जाण्याचें ठरविलें. विद्यासागरांनीं त्यांस पुष्कळ कलकत्त्याहून लिहिलें. 'आपणांस फार त्रास होईल. आपण दूर गेल्यामुळें जें समाधान कुटुंबांत आहे तें नाहींसें होईल' वगैरे त्यांनीं लिहून पाहिलें, परंतु ठाकुरदास निश्चय बदलीतना. कारण त्यांनीं एक भयंकर स्वप्न पाहिलें. त्या

स्वप्नांत त्यांनीं असें पाहिलें कीं ' आपलें सुंदर घर भस्म झालें आहे, '—जळून खाक झालें आहे; विद्यासागरास त्याचे स्नेही, मित्र, आप्त त्रास देत आहेत वगैरे. असें स्वप्न पडल्यामुळें जर खरोखरच असें झालें तर तें आपल्या डोळ्यां-आड होवो असें ठाकुरदास यांस वाटलें. " डोळ्यांआड आणि मसणपाड " अशी म्हण आहे. मागें कांहीं झालें तरी पुरवतें; परंतु समक्ष नको. विद्यासागर कलकत्त्याहून घरीं आले, रडले, परंतु वडिलांचा निश्चय तो निश्चय. ठाकुरदास जावयास निघाले. त्यांची पत्नी पण त्यांच्या बरोबर काशीस गेली. आईबाप काशीस गेले. परंतु आई लवकरच वीरसिंह गांवास परत आली. कारण काशीची हवा तिला सोसेना. ती पतीस आपल्या बरोबर परत आणण्याचा प्रयत्न करीत होती. ठाकुरदास यांचा काशींत देह ठेवण्याचा विचार होता म्हणून ते पुनरपि घरीं येण्यास कबूल होतना. भगवती म्हणाली, ' तुम्ही इतक्यांत खात्रीनें मरणार नाहीं. आणि तुम्ही येथेंच राहलेत तरी मी सांगून ठेवितें तुमच्या आधीं मीच काशींत येऊन मरेन. परंतु तुम्ही मात्र जिवंत राहाल." शेवटीं भगवती एकटीच घरीं परत आली. घरीं परत आल्यावर थोडक्याच दिवसांत ठाकुरदास यांस पडलेलें स्वप्न खरें ठरलें. विद्यासागर यांनीं लहान मुलांसाठीं ' बोधोदय ' म्हणून एक पुस्तक लिहिलें आहे. त्यांत ते एके ठिकाणीं लिहितात " स्वप्न सकल सत्य नही, अमूलक चिंता मात्र.' स्वप्नें हीं खरीं नसतात; उगीच नसती काळजी मात्र उत्पन्न करितात. विद्यासागरांचें हें लिहिणें त्यांच्या वडिलांच्या स्वप्नांच्या बाबतींत तरी खोटें ठरलें. विद्यासागर यांचें सुंदर घर जळून गेलें. विद्यासागर कलकत्त्याहून धांवत आले. कोणास अपाय इजा मात्र झाली नव्हती याबद्दल त्यांनीं देवाची प्रार्थना केली. नंतर त्यांनीं नवीन घर बांधण्यास आरंभ केला. त्या वेळेस त्यांस पुष्कळांनीं सांगि-तलें कीं आतां चांगली दगडांची टोलेजंग इमारत बांधा. विद्यासागर म्हणाले ' मी गरीब ब्राह्मणाचा मुलगा. आमच्या कुळाला टोलेजंग इमारती शोभणार नाहींत.' विद्यासागरांनीं सर्व भावांची राहावयाची वगैरे व्यवस्था केली. पत्नीस जातांना त्यांनीं कलकत्त्यास नेलें. ते आईसही आग्रह करीत होते परंतु आई म्हणाली " मी जर कलकत्त्यास आलें तर हे गरीब लोक गांवांत कोणाच्या जिवावर राहतील ? त्यांच्या साठीं मला येथेंच राहलें पाहिजे." विद्यासागर कलकत्त्यास निघून गेले.

यानंतर लवकरच कुटुंबांत भांडणें सुरू झालीं. विद्यासागरांचे भाऊ होते,

त्यांस विद्यासागरच मदत करीत. दीनबंधू जे होते, ते मोठ्या स्वतंत्र वृत्तीचे व स्वाभिमानी बाण्याचे होते. त्यांस पगार थोडा असे तरी ते आतां विद्यासागरांकडे पैसे मागत नसत. परंतु विद्यासागर दीनबंधूच्या बायकोजवळ पैसे देत व अशाप्रकारें त्यांचें उणें पडूं देत नसत. शंभुचंद्र यानीं एका पुनर्विवाहाच्या बाबतींत कांहीं वाईट गोष्ट केली म्हणून विद्यासागर यांस वाईट वाटत होतें. शिवाय या भावाच्या बायका आपसांत फार भांडत. विद्यासागर यांची पत्नी पण जरा उतावळ्या स्वभावाची होती; कलागती होत; दिनमयी हीं भांडणें विद्यासागरांस सांगावयाची. विद्यासागरांस हें ऐकून वाईट वाटे, व ते आपल्या पत्नीस शांतपणें वागण्यास सांगत. शेवटीं आपले भाऊ ज्यांस वाढविलें, शिकविलें, तेच आपणाबद्दल साशंक आहेत असें विद्यासागरांनीं पाहिलें. त्या वेळेस त्यांचें मन विरक्त झालें. एवढा सर्व खटाटोप करून सर्व आपल्याच नांवानें खडे फोडतात हें पाहून त्यांचें मन वैतागलें. सर्व जगाचा संबंध सोडावा व वनांत जाऊन वानप्रस्थाश्रम किंवा संन्यासच घ्यावा असे विचार मनांत येऊन त्यांस निश्चयाचें स्वरूप मिळूं लागलें. शेवटीं एक दिवस त्यांनीं ठरविलेंच कीं आतां संन्यास घ्यावयाचा. त्यांनीं निरवानिरवीचीं पत्रें सर्वांस लिहिलीं. प्रथम आईस पत्र लिहिलें. "आजपर्यंत जे कांहीं तुला त्रास दिले असतील, ज्या कांहीं चुका झाल्या असतील, त्याची उदार मनानें मला क्षमा कर. आई, आतां मी जगास कंटाळलों आहें. मी तुला अखेरचा प्रणाम करितों. तुझी जर कांहीं इच्छा असेल तर मला ताबडतोब कळीव म्हणजे मी ती पूर्ण करीन व मग जगाचा संबंध सोडीन." याप्रमाणें मजकूर लिहून आपल्या पत्नीस दुसरें पत्र लिहिलें. "मी जगाचा कायमचा निरोप घेत आहें. आतां आपले संबंध संपले. मी पोटापाण्याची ददात तुम्हांस ठेविली नाहीं. नीट काटकसरीनें वागलांत म्हणजे तें तुम्हांस जन्मभर पुरून उरेल. दीनमयी, एकच गोष्ट तुला सांगावीशी वाटते ती ही कीं, जगाशीं जरा सहनशीलपणानें वागावें; मिळतें घ्यावें. उतावीळपणानें, अधीरपणानें स्वतःस व दुसऱ्यास त्रास होतो." यानंतर तिसरें पत्र शंभुचंद्र यांस लिहिलें. 'मी आजपर्यंत तुला मदत केली पुढेंही तुला मदत मिळत जाईल अशी व्यवस्था होईल. शंभु, शेजाऱ्यापाजाऱ्यांजवळ जरा सलोख्यानें राहात जा. नेहमीं हमरीतुमरीवर येणें यांत कल्याण नाहीं व हें शोभत नाहीं.' चवथें पत्र ईशानचंद्रास होतें. 'तुला दर

महिना ३० रुपये येत जातील. सध्यां तुला जास्त पैसे देण्यांत येणार नाहींत. नीट शहाणपणें वागावें.' शेंवटचें पत्र काशीस वडिलांस लिहिलें. हें पत्र पुष्कळ लांबलचक होतें. ' बाबा, मी आपणांस शेवटला प्रणिपात करितों. आजपर्यंतच्या माझ्या अनुभवानें मला हेंच शिकविलें कीं, ' संसारांत, या जगांत तुजसारखा हतभागी अन्य कोणी नाहीं. ' बाबा, मीं सर्वांस सुखविण्याचा प्रयत्न केला. कोणासही दुखवूं नये म्हणून स्वतःस अनेक वेळां संकटांत व दुःखांत घालून घेतलें; परंतु मला या गोष्टींत यश आलें नाहीं. जो सर्वांस संतोष देऊं पाहतो त्यांस कोणासच संतोष देतां येत नाहीं, हेंच कटुं सत्य शेवटीं माझ्याही अनुभवांस आलें. घरींसुद्धां कुटुंबांत एकंदर अशांतता व असमाधान आहे. त्यांचीं कारणें मी आपणांस निवेदन करूं इच्छित नाहीं, पुनर्विवाहासारख्या चळवळी हातांत घेऊन मी कर्जबाजारी झालों आहें. अनेकांनीं वचनें दिलीं परंतु तीं वायफळ व कवडीमोल ठरलीं. जोंपर्यंत मी कर्जाच्या बजबजपुरींत आहें, ऋणानें बद्ध आहें, तोंपर्यंत मला समाजाचा सर्व संबंध नीतिदृष्टया सोडतां येत नाहीं व मी सोडणारही नाहीं. कर्ज फेडून टाकण्यासाठीं प्रयत्न करितों आहें. अनृणी झालें म्हणजे संन्यास घेण्यास कांहीं बंधन राहणार नाहीं.

आपण माझ्या हातून ज्या चुका, जे अपराध झाले असतील ते पोटांत घाला. आपणांस दर महिना जो पैसा पाठविण्यांत येई, तो अतःपरही पाठविण्यांत येईल. कृपाकरून अनुज्ञा द्याल अशी आशा आहे. "

वरील आशयाचें पत्र वडिलांस गेलें. वडिलांनीं जरा रागानें पत्र लिहिलें कीं, ' हा काय मूर्खपणा चालविला आहेस ! चोर ताट चोरून नेतील म्हणून का भुईवर, जमिनीवर आपण भात खावा ? हें अगदीं अनुचित आहे. दुष्ट त्रास देणारच. त्यामुळें कपाळांत, डोक्यांत राख घालून जाणें हें धीराचें काम नव्हे. ' मुक्ताबाईनें ज्ञानेश्वरांस सांगितलें ' तरीच संत व्हावें । जग बोलणें सोसावें ' – जगाचीं बोलणीं, भाऊबंदांचे त्रास हें सर्व सहन करून आपण आपला मार्ग चोखाळीत राहावयाचें, हें मोठ्या माणसाचें काम. विद्यासागरांच्या इतर भावांची पण पत्रें आलीं. त्यांनींही हात जोडून विनंती केली " आपण असें करूं नये. आमचे अपराध पोटांत घाला." आईनें पण गळ घातली. शेवटीं विद्यासागर समाज सोडून गेले नाहींत, परंतु ते आपल्या

मातृभूमीस परत गेले नाहींत. तेथें गेल्यावर कौटुंबिक भांडणें पाहावयास लागतील तर जाणेंच नको.

विद्यासागर यांचे वडील काशीस आजारी पडले. त्यांचें पत्र आलें. त्याबरोबर विद्यासागर, दीननाथ, शंभुचंद्र व भगवती हीं सर्व काशीस तावडतोब निघून आलीं. ठाकुरदास यांस उतार पडला; यामुळें विद्यासागर पुन्हा कलकत्त्यास निघून आले. परंतु इकडे विद्यासागरांची आई भगवती ही एकाएकीं फार आजारी झाली. तिला रक्ती अतिसार झाला व ती लवकरच आसन्नमरण झाली. शेवटपर्यंत भगवती नीट शुद्धींत होती. ती आपल्या पतीस म्हणाली, " असे माझ्याजवळ बसा; मला आशीर्वाद द्या." ठाकुरदास म्हणाले, " मी काय आणखी आशीर्वाद देणार ? तूं पुण्यपावन साध्वी स्त्री आहेस, तूं आपल्या पुण्याईनें अहेवपणीं स्वर्गारोहण करीत आहेस. तुला मी काय देणार." पतीच्या मांडीवर तिनें काशींत, पूर्वीं म्हटल्याप्रमाणें पतीच्या आधीं प्राण सोडला. विद्यासागर मरतांना आईजवळ नव्हते. जेव्हां कलकत्त्यास त्यांस ही वार्ता कळली तेव्हां केवढा आकांत केला ! एवढे मोठे विद्यासागर परंतु दुःखानें अगदीं वेडे झाले. जेव्हां त्यांस आईची आठवण येई, त्या त्या वेळेस ते रडूं लागावयाचे. त्यांच्या भावना फार कोमल होत्या. पूर्वींचे सर्व प्रसंग त्यांच्या डोळ्यांसमोर तावडतोब उभे राहावयाचे. कल्पना व स्मरण हीं फार. एकदां एका मित्राजवळ सहज गप्पागोष्टी चालल्या होत्या. बोलतां बोलतां विद्यासागरांच्या आईसंबंधीं गोष्टी निघाल्या. आईचा संबंध आल्याबरोबर गतकाळच्यां सर्व आठवणी एकदम विद्यासागरांच्यासमोर उभ्या राहिल्या व ते आपले रडूं लागले. त्यांच्या मित्रास आईचा उल्लेख केल्याबद्दल वाईट वाटलें व तो मित्र म्हणाला " आपल्या दुःखांस मी नकळत कारणीभूत झालों याची मला क्षमा करा." डोळे पुसून विद्यासागर म्हणाले, " यांत क्षमा कसली करावयाची ? अहो, उलट मी तुमचा आभारी आहें; कारण या निमित्तानें तरी मातेची पूज्य स्मृति होऊन कृतज्ञतेचे चार अश्रु आले."

आई मरण पावल्यावर विद्यासागर आपल्या वडिलांस पुनःपुनः कलकत्त्यास येण्यास लिहीत. कारण काशीस जाणें विद्यासागरांच्या जिवावर येई. काशीची आठवण झाली म्हणजे आईची आठवण व्हावी व मग डोळे डबडबून यावे. ज्या काशीच्या कल्पनेनें इतका शोकपूर यावा, त्या प्रत्यक्ष

काशींत जाऊन, जेथें आई गतप्राण झाली, जेथें आपण नव्हतों, असें तें स्थान, ती खोली पाहून विद्यासागर यांस किती वाईट वाटलें असतें याची कल्पना तुम्हीच करा. ठाकुरदास यांनीं विद्यासागरांस असा हुकूम केला कीं, तूंच मला येऊन भेट, आतां पुष्कळ दिवस झाले. मी कांहीं तिकडे येणार नाहीं; तूं ये. तुला पाहाण्याची मला इच्छा आहे. शेवटीं विद्यासागर काशीस आले. आईच्या आठवणीनें शोकगंगा लोटली. पित्याची भेट झाली. परंतु पित्याचा पूर्वीचा आजार वाढला व विद्यासागर तेथें असतां ठाकुरदास पण १८७६ मध्यें निजधामास गेले. आई-बाप दोघेंही आतां कैलासवासी झालीं. ईश्वरचंद्रांचीं दैवतें शरीररूपानें, पार्थिवरूपानें त्यांस अंतरलीं. आतां मनोमय मूर्ति राहिल्या. फोटोंतील मूर्ति राहिल्या.

विद्यासागर व त्यांचा मुलगा नारायण यांच्यामध्यें कांहीं तरी बेबनाव झाला. विद्यासागर हे मुलाकडे जात नसत. त्याचें दर्शनही घेत नसत. विद्यासागरांची पत्नी दीनमयी ही मुलाजवळ रहात असे. आईबाप मेल्यावर विद्यासागर एकटे, हातानें स्वयंपाक करून रहात. कधीं कधीं दीनमयी त्यांच्याकडे येई. परंतु मुलास येण्यास परवानगी नव्हती. शेवटीं दीनमयी पण इहलोक सोडून गेली. विद्यासागरांवर एकेक संकटें येऊं लागलीं. त्यांस चार मुली होत्या. त्यांपैकीं एकीवर वैधव्याचा प्रसंग ओढवला. दुःखाचे ढग जमूं लागले. आयुष्याच्या सायंसमयीं समाधान लाभावयाचे ऐवजीं दुःखाघातच होऊं लागले. ईश्वरचंद्र हे आतां आजारी दिसूं लागले. एकदां तर ते चांगलेच आजारी पडले. त्यांच्या घरांत कोणी नसे. कारण मुलास येण्यास परवानगी नाहीं. मुली असत किंवा कोणी मित्र शुश्रूषा करीत. वडील आजारी असून त्यांस आपण पाहूं शकत नाहीं, त्यांची चाकरी करण्याचें भाग्य आपल्या नशीबीं नाहीं, या विचारानें नारायणाच्या हृदयाचें पाणी होई. क्षुल्लक अपराध झाला त्याच्यासाठीं बाबांनीं एवढे घोर शासन करावें कां ? शेवटीं निर्वाणीचें पत्र वडिलांस पाठविण्याचें नारायणानें ठरविलें व हृदयास पाझर फोडणारें, दगडास रडविणारें पत्र त्यांनीं लिहिलें. 'बाबा, क्षमा करा. आपण मजला घराचें निदान दर्शन देण्याची तरी परवानगी द्याल का ? माझा मानसविहंग आपल्या भोंवतीं घिरट्या घालीत असतो. माझी कुडी येथें आहे, परंतु मन तुमच्या चरणीं जडावलें आहे. तुम्ही बिछान्यावर विव्हळत असतां तुमची सेवा करण्याचें पुण्य या पाप्याच्या नशीबीं कां असूं नये ? बाबा, लोक तुम्हांला देव मानतात,

दयेचा सागर समजतात. आपण अभूतपूर्व पुरुष असें सर्व म्हणतात. माझ्याच बाबतींत आपण इतके निष्ठुर कसे झालांत ? मला आई सोडून गेली. आपल्या कृपेची छाया मजवर असावयाची ती पण नाहीं. म्यां हतभाग्यानें कोणाकडे पाहावें ? आई मेलेली, बाप असूनही मी त्यांस आंचवलेला—आपण अनाथांचे नाथ व गरिबांचे कैवारी. परंतु आपला प्रत्यक्ष मुलगा मात्र अनाथ व दीन झाला आहे त्याची कींव तुम्ही कां करूं नये ? बाबा, माझ्या पापांची, अपराधांची मोठ्या मनानें आपण क्षमा नाहीं का करणार ? पुत्रवात्सल्यानें मला जवळ नाहीं का बोलवणार ? मी आपल्याकडे येतों. आपण माझ्याकडे कृपादृष्टीनें पाहूं नका. माझें काळें तोंड प्रसन्नतेनें पाहूं नका. परंतु आपली मला सेवा-चाकरी करूं द्या. ' हें हृदयद्रावक पत्र वाचल्यावर कठोर झालेला ईश्वरचंद्र पाझरला. ईश्वरचंद्रांच्या डोळ्यांतून गंगा वाहिली. मुलास त्यांनीं बोलाविलें व यापुढें नारायण, त्याची बायको, त्याचीं मुलें हीं विद्यासागरांजवळ राहिलीं. विद्यासागर या दुखण्यांतून उठले. परंतु त्यांच्या मुलाची सुंदर कन्या प्रभावती ही देवानें उचलून नेली. विद्यासागरांस प्रभावतीचा फार लळा. प्रभावती ही नसली म्हणजे त्यांस सर्व अंधार दिसावयाचा. विद्यासागरांनीं ' प्रभावती संभाषण ' म्हणून एक लहानसें पुस्तक नातीच्या निधनानंतर लिहिलें. तें फार करुणरसपूर्ण आहे. ' बाळ, तूं कोठें आहेस ग; तूं कसें बोलावयाचीस; तुझें चालणें किती मनोहर; नाचणें किती सुंदर व डौलदार. तुझ्या त्या मनोरम क्रीडा. तें सर्व आतां कोठें आहे ? आम्हांस क्षणभर आनंदसाग-रांत सोडून पुन्हा अशा दुःखदावाग्नींत कां बरें टाकतेस ? येथें थोडाच वेळ थांबावयाचें होतें, तर तूं आलीस तरी कां ? क्षणभर येऊन आमच्या मनास हाय हाय करून चटका लावून निघून जाणें ही क्रूरपणाची परमावधि नाहीं का ? असला दुष्टपणा लहान मुलास शोभत नाहीं." वगैरे प्रकारें या पुस्तकांत वर्णन आहे.

कुटुंबांत अशा प्रकारें दुःखादिकांनीं पोळलेले ईश्वरचंद्र समाजांत सर्व तऱ्हांनीं पुढाकार घेत. मोठेमोठे लोक त्यांचे मित्र होते व सर्व चळवळींत ईश्वरचंद्रांस प्राधान्य असे. कवि, नाटककार, सुधारणाकार, सरकारी अधिकारी, नट, विद्यार्थी सर्वांनांच विद्यासागरांनीं मोहिनी घातली होती. विद्यासागरांचा विनोदी स्वभाव व मार्मिक बोलणें या समाजांतील व्यवहारांत पुष्कळ वेळां दिसून येई. ते हजरजबाबी व दुसऱ्यांस निरुत्तर करणारे असे होते. एकदां

विद्यासागर आपल्या खेडेगांवांत असतां त्यांच्या घरावर ४०।५० दरवडेखोरांचा डाका आला. घरांतील सर्व मंडळी व विद्यासागर मागच्या दरवाजानें पसार झाले. चोरांनीं सर्व मिळेल तें लांबविलें. परंतु सर्व मंडळींचे प्राण तर वांचले. 'शीर सलामत तर पगडी पचास' अशी म्हण आहे. पुढें विद्यासागर कलकत्त्यास आले. तेथें गव्हर्नरसाहेबांनीं विद्यासागरांस म्हटलें "काय शेवटीं भागुबाईप्रमाणें पळूनच गेलांत ना? भित्रे तुम्ही. तुमच्या बाता ऐकाव्या मात्र." विद्यासागर म्हणाले, "जगांत मनुष्यांस संतुष्ट करणें फार कठीण आहे. समजा, मी चोरांजवळ लढाई केली असती व त्यांत जिवानिशीं मारला जातो तर 'काय अविचारी; एवढ्या चोरांजवळ का हुज्जत घालवयाची व झुंझ खेळावयाची' असें तुम्हीं म्हटलें असतें; आणि आतां निघून आलों तर कसें पळून आले म्हणून म्हणावयास तयार. एकंदरींत लोक हे दुराराध्य आहेत." गव्हर्नर हंसले. विद्यासागरांमध्यें हा विनोदाचा गुण लहानपणापासून होता. एकदां त्यांचे एक शिक्षक जयगोपाळ तर्कालंकार यांनीं मुलांस समस्यापूरणार्थ कांहीं श्लोकचरण दिले. त्यांतील एक चरण असा होता 'गोपालाय नमोस्तुते.' विद्यासागर म्हणाले 'गुरुजी हा गोपाल कोणता? तो तीनचार हजार वर्षांपूर्वी होऊन गेलेला जुनापुराणा तो कीं आमच्या समोर उभे आहेत ते?' गुरुजींस कौतुक वाटलें व विद्यार्थ्यांमध्यें हंशा पिकला.

एकदां रामकृष्ण बानर्जी (ज्यांस संस्कृत शिकतां यावें म्हणून उपक्रमणिका विद्यासागरांनीं लिहिली होती,) यांच्याकडे प्रख्यात न्यायाधीश द्वारकानाथ मित्र, कृष्णदास पाल, विद्यासागर हे सर्व जमले होते. यांच्या गप्पागोष्टी चालल्या होत्या, त्या वेळेस खिडकींतून एक खेडवळ मनुष्य सारखा डोकावून पाहात होता. विद्यासागरांनीं त्यास आंत बोलावून घेतलें. 'कायरे, सारखें खिडकींतून काय डोकावतो आहेस' असें विद्यासागरांनीं त्यास विचारलें. तो घाबरला व उत्तर देईना. 'सांगना, घाबरावयास काय झालें?' असें विद्यासागरांनीं म्हणतांच तो खेडवळ म्हणाला 'द्वारकानाथ मित्र न्यायाधीश मला पाहावयांचे होते. येथें आले आहेत असें ऐकलें म्हणून येथें आलों' विद्यासागर म्हणाले, 'हे जे सुंदर गृहस्थ आहेत त्यांचें नांव कृष्णदास पाल, व पलीकडे जे यांच्यापेक्षां सुंदर गृहस्थ आहेत ते द्वारकादास मित्र. आतां ओळख बरें कोणते ते.' गंमत अशी होती कीं, कृष्णदास पाल हे

अगदीं कुरूप होते; त्यांच्यापेक्षांही द्वारकानाथ हे कुरूप होते. विद्यासागरांनीं केलेल्या थट्टेमुळें तो खेडवळ चपापला व हे सर्व खों खों करून हंसूं लागले.

या कलकत्त्यांतील बड्या लोकांनीं एक खाना-क्लब—अल्पाहारमंडळ काढलें होतें. एकदां या खाबू मंडळाची खाण्याच्या कार्यासाठीं सभा भरली होती. विद्यासागर या सभांस हजर राहात; परंतु त्या सभेंत प्रत्यक्ष कार्यांत हात न घालतां ते स्वस्थ गंमत करीत व गप्पा मारीत. आज जी सभा भरली होती त्या सभेंत खाण्याची अगदीं चंगळ होती. एक खाबूनंदन इतकें पोटांत कोंबतां झाला कीं, तो शेवटीं अस्वस्थ झाला. त्याच्या पोटांत कळा उठल्या-नें तो गडबडां लोळूं लागला. झालें. डॉक्टरांस निमंत्रणें गेलीं. नळ्या लावल्या, ठाकठोक झालें. वांतीचें औषध देण्यांत आलें व स्वारी नीट शुद्धी-वर आली. नंतर सभेचा जीव जेव्हां खालीं पडला, तेव्हां सभेंत एका गृह-स्थानें असा ठराव मांडला कीं, ' सदरहू इसम यास खाबूमंडळाचा सभासद करून घेऊं नये. त्याचें नांव कमी करावें. या मंडळाची जबाबदारी त्यास नीट पार पाडतां येत नाहीं. तो कार्य व्यवस्थित करीत नाहीं.' या ठरावास विद्यासागर यांनीं जोराचा विरोध केला. ते म्हणाले, " हा अकृतज्ञपणा आहे. जो सभासद मंडळासाठीं प्राण देण्यास तयार झाला, प्राण गेले तरी बेहेत्तर परंतु या मंडळाचें काम कसोशीनें करीन असें ज्यानें प्रत्यक्ष कृतीनें दाखविलें, त्याचें तुम्हीं नांव कमी करतां, याहून अनुदारपणाचें दुसरें कोणतें कृत्य असूं शकेल? या सद्गृहस्थाचें नांव कमी तर करूं नयेच; उलट त्याच्या गुणगौरवपर ठराव आपण सर्वांनीं एकमतानें उभें राहून मंजूर करूं या.' या एकंदर भाषणानें फारच गंमत झाली.

कलकत्त्यामध्यें जें जें कांहीं महत्त्वाचें व्हावयाचें त्यांत विद्यासागर नाहींत असें कधींच व्हावयाचें नाहीं. ज्या वेळेस सुरेंद्रनाथ बानर्जी वगैरे लोक इंग्लडां-तून परत आले, त्या वेळेस त्यांच्या स्वागतार्थ सातनळ्यांजवळ जाहीर सभा भरली. ती सभा बोलविण्यांत विद्यासागरही प्रमुख होते. आणि पुढें वय मोजण्यासंबंधीं जेव्हां प्रश्न निघाला तेव्हां विद्यासागर, राजेंद्रनाथ मित्र वगैरेंनीं हिंदु-वयोगणनापद्धति व पाश्चात्य आंग्लगणनापद्धति भिन्न आहेत असें दर्शवून दिलें; व या इंग्लंडमधून आलेल्या तरुणांस वयाची अट आड यथार्थपणें येऊं नये म्हणून त्यांनीं प्रयत्न केला. कलकत्त्यांत एक ' हिंदुपारिवारिक-वृत्तिभाण्डार ' काढण्यांत आलें, त्यामध्यें विद्यासागर पण होते. Hindu

family Relief fund हा याचा अर्थ. हिंदूंच्या कुटुंबांतील लोकांस आधार मिळावा म्हणून काढलेला हा निधि होता. यांत रमेशचंद्र दत्त वगैरे लोक होते.

महेंद्रलाल सरकार हे कलकत्त्यांतील एक नामांकित श्रीमंत गृहस्थ. हे मोठ्या स्वतंत्र बाण्याचे होते. यांनीं लग्न केलें नव्हतें. कलकत्त्याच्या मेडिकल कॉलेजमधील एक उत्कृष्ट विद्यार्थी म्हणून ते समजले जात. हे पहिले एम्. डी. होते. विद्यासागर व महेंद्रलाल एकमेकांचे मोठे मित्र. महेंद्रलाल सरकारांचें जरा कांहीं दुखलेंखुपलें कीं विद्यासागर त्यांच्या बिछान्याजवळ बसून राहावयाचे, त्यांची नीट काळजी घ्यावयाचे. ‘ तुम्हीं लग्न केलें नाहीं तर तुमची काळजी कोण घेणार, ’ असें ते म्हणावयाचे. नेहमीं त्यांच्या औषधपाण्याची वगैरे सर्व सोय लावून द्यावयाचे. विद्यासागर सर्वसामान्य जनांचे सुद्धां मित्र; मग ज्यास ते मित्र समजत, त्याच्यासाठीं ते किती झटतील याची कल्पना करा. त्या मित्रासाठींच ते खटपट करीत, त्रास घेत असें नव्हे, तर मित्राच्या घरांतील इतर कोणी मंडळी वगैरे आजारी पडली तर त्यांचीही वास्तपुस्त विद्यासागरच करावयाचे. मित्राचें घर म्हणजे स्वतःचेंच घर. महेंद्रलाल सरकार यांनीं रसायनशास्त्रास चालना द्यावी म्हणून एक मंडळ स्थापलें. मोठी प्रयोगशाळा त्यांनीं स्थापिली. या संस्थेच्या निधीस विद्यासागर यांनीं १००० रु. दिले, याच रसायन शाळेंत प्रसिद्ध मद्रासी शास्त्रज्ञ रामन् हा प्रथम जात असे. ‘नीलदर्पण’ या बंगाल्यांतील प्रसिद्ध नाटकाचा कर्ता दीनबंधू मित्र हे विद्यासागर यांचे दोस्त होते. बंगालमधील निळीची लागवड करणाऱ्यांवर युरोपीयन मळेवाले, जमीनदार जो जुलूम करीत, त्याचें या नाटकांत उद्घाटन केलें आहे. हें नाटक फार लोकप्रिय झालें होतें. प्रत्यक्ष विद्यासागर सुद्धां हें नाटक पाहावयास गेले होते. गिरीशबाबूंची नाटकमंडळी कलकत्त्यास होती. गिरीशबाबू हे स्वतः नामांकित नट, व नाटककार होते. नाटककंपनी त्यांच्या मालकीची होती. गिरीशबाबू यांनीं जवळजवळ ४० नाटकें लिहिलीं आहेत. विद्यासागर नीलदर्पण नाटक पाहावयास गेले. नाटकगृह गच्च भरून गेलें होतें. विद्यासागर अगदीं पुढें खुर्चीवर बसले होते. गिरीशबाबूंनीं एका युरोपीय जमीनदाराचें काम केलें. त्यांनीं आपलें काम फारच उत्कृष्ट केलें. एका लागवड करणाऱ्या मजुरावर ते अत्याचार करीत होते. त्याचा छळ करीत होते.

हें सर्व प्रत्यक्ष तेथें चाललें असतां विद्यासागर यांचा राग राहीना. त्यांस संताप आला. आपण नाटकगृहांत आहोंत आणि हें समोर जें दिसतें आहे तें नाट्य आहे, दृश्य काव्य आहे; हें त्यांच्या लक्षांत राहिलें नाहीं. यथार्थ व खरोखरच्या गोष्टी आपल्या डोळ्यांसमोर होताहेत असें त्यांस वाटलें. विद्यासागर संतापले व असला नराधम काय कामाचा असा त्यांनीं विचार करून पायांतील जोडा त्यांनीं नाटकांतील जमीनदारावर फेंकला. झालें, लगेच पडदा पडला व गिरीशबाबू साधेपणानें पुढें आले व म्हणाले, " आज माझ्या जन्माचें सार्थक झालें, ज्या धंद्यांत पडलों, त्या धंद्यांत उत्कृष्ट प्राविण्य मिळविलें असें विद्यासागरांनीं मला प्रशंसापत्र दिलें आहे; आणखी अन्य कोणाच्या प्रशंसापत्राची इच्छा मला असणार ? " गिरीशबाबू हे विद्यासागर यांस गुरु मानीत. विद्यासागरांच्या वेताळपंचविशीनें गिरीशांस बंगाली भाषा शिकविली. गिरीश यांनीं आपलें एक नाटक विद्यासागर यांस अर्पण केलें आहे. त्या अर्पणपात्रिकेंत गिरीशबाबू लिहितात. ' गुरुदेव, दीननाथ, मातृभाषा मी नीट पूर्वीं न जाणावी असें नाहीं. परंतु आपल्या वेताळपंचविशीनें मला बंगाली भाषा शिकविली. आपण माझे गुरु आहांत; जें आपण शिकविलेंत त्याचीं आज परीक्षा या पुस्तकरूपानें देत आहें. माझी परीक्षा घ्या मी नेहमीं आपणांस मनांत वंदन करीत असतों."

ज्या दीनबंधु मित्रांचें हें नीलदर्पण नाटक, त्यांनीं सुद्धां आपलें ' द्वादश कविता ' हें पुस्तक विद्यासागरांस अर्पण केलें आहे. त्या अर्पणपत्रिकेंत दीनबंधु लिहितात " आपण बंगाली वाङ्मयाचे जनक आहांत, बंगाली भाषा आपली कन्या आहे. " ( आपणार तनया ). दीनबंधु हे पोष्टमास्तर होते. त्यांचा पगार अगदीं थोडा असे. त्यांस इतर स्थावर मिळकत, जमीनजुमला कांहीं एक नव्हतें. दीनबंधु आकस्मात् एके दिवशीं निवर्तले. त्यांचें कुटुंब मोठें होतें. या कुटुंबाचा पोशिंदा नाहींसा झाला; कुटुंबास दुसरा आधार नाहीं. परंतु विद्यासागर होते ना. विद्यासागर यांनीं आपल्या मित्राच्या कुटुंबास कित्येक दिवस सर्वतोपरी संभाळिलें. नवीनचंद्रसेन हे प्रख्यात बंगाली कवि. यांससुद्धां ईश्वरचंद्रांनीं वाढविलें. नवीनचंद्र अगदीं गरीब होते. दारिद्र्यानें गारठून जाणारें हें सुंदर कमळ होतें. विद्यासागरांनीं हें कमळ–हें सुंदर फूल–टवटवीत व सुंदर ठेविलें. नवीनचंद्रास शिकण्यास सर्वतोपरी मदत विद्यासागरांची. कृतज्ञताबुद्धीनें नवीनचंद्रांनीं आपलें अभिनव ' पलाशिर

युद्ध', 'प्लासीची लढाई' हें महाकाव्य ईश्वरचंद्रांच्या चरणीं वाहिलें. त्या अर्पणपत्रिकेंत ते लिहितात, "देवा, मी अफाट सागरांत गटंगळ्या खात होतों. परंतु आज परतीरास येऊन लागलों आहें. आपलें वात्सल्य व प्रेम यांचें हें कार्य आहे. मी पूर्वी आपले चरण माझ्या कढत अश्रूंनीं भिजविण्या-साठीं आपणांकडे आलों होतों. आपण सदय झालांत. दयेच्या एका बिंदूनें माझी सिंधूप्रमाणें अफाट आपदा आपण हरण केलीत. आज मी पुन्हां आपल्या चरणांजवळ आलों आहें. चिंतादावानलानें दग्ध झालेली माझी मनोवल्लरी आज पुनरपि टवटवीत आहे. आज माझें तोंड अश्रूंनीं डवरलेलें नाहीं; चिंतेनें काळवंडलें नाहीं; हृदय आनंदानें पूर्ण आहे; मुखमंडल प्रफुल्ल आहे. देवा, माझ्या मनोवल्लीचें एक कुसुम आपल्या चरणावर वाहण्यास मी आलों आहें. त्याचा प्रेमानें व कौतुकानें स्वीकार करा." मायकेल मधुसूदन दत्त यांनीं एका सुंदर चतुर्दश पद्यावलींत विद्यासागरांचा गौरव केला आहे. नाटककार, कवि हे जसे विद्यासागरांचे मित्र व त्यांस देवाप्रमाणें मानणारे, त्याप्रमाणें इतरही मोठमोठे गृहस्थ होते. गुरुदास बानर्जी हे कलकत्ता विद्यापीठाचे पहिले हिंदी व्हाइस चॅन्सलर. कर्झननें नेमलेल्या शिक्षणचौकशीमंडळांत ते नेमले गेले होते. हे फार विद्वान्, साधे व सरळ. यांची आई निवर्तल्यावर, आईच्या सर्व प्रेतसंस्कारानंतर, त्यांना कांहीं तरी आईच्या नांवें धर्मादाय करावयाचा होता. त्यांनीं एक सुंदर सोन्याचें जडावाचें पानपात्र तयार केलें; आणि मग तें विद्यासागर यांस अर्पण करावयाचें असें ठरविलें, विद्यासागरांपेक्षां जास्त पवित्र कोण ब्राम्हण मिळणार ? परंतु विद्यासागर या गोष्टीस कबूल होतना. शेवटीं गुरुदास मोठ्या प्रेमानें म्हणाले, 'माझ्या आईसाठीं हें मी देतों आहें ना ?' झालें. 'आई' या दोन अक्षरी मंत्राचा नेहेमींप्रमाणें परिणाम झाला. आई या शब्दानें ईश्वरचंद्र वश व्हावयाचेच. मला आई नाहीं असें कोणीं म्हटलें कीं विद्यासागर त्याच्यासाठीं रडावयाचे. आई हें त्यांचें जीवन होतें. आई हें अनुपम प्रेमाचें, भक्तीचें, सर्वस्वाचें त्यांना स्थान होतें. त्रिभुवनांतील सौंदर्य 'आई' या दोन स्वरांत सांठविलें होतें. सर्व पावित्र्य, सर्व चांगुलपणा सर्व प्रेम यांचें ठिकाण, एकमेव निवासस्थान म्हणजे हे दोन स्वर.

विद्यासागर यांनीं तें पानपात्र घेतलें. गुरुदासांसारखा मातृभक्त दाता व विद्यासागरांसारखा परम मातृभक्त या दानाचा परिग्रह करणारा याहून मोठा

योगायोग कोठें जुळून येणार? या करंडकावर खालील अनुष्टुप् वृत्तांतील श्लोक गुरुदासांनीं कोरविला होता.

"पानपात्रमिदं दत्तं विद्यासागरशर्मणे ॥
स्वर्गभावतया मातुर्गुरुदासेन श्रद्धया" ॥ १ ॥

कैलासचंद्र बसु म्हणून दुसरे एक बडे गृहस्थ विद्यासागरांचे मित्र होते. यांनीं विद्यासागरांचा एक मोठा फोटो त्यांच्याजवळून स्वतःसाठीं मागून घेतला. आपल्या घरीं आणून त्याच्याखालीं खालील श्लोक त्यांनीं मोठ्या प्रेमानें लिहिला:

"श्रीमानीश्वरचंद्रोऽयं विद्यासागरसंज्ञकः
भूदेवकुलसंभूतो मूर्तिमद्दैवतं भुवि"

विद्यासागरांचे अनेक फोटो, ज्यांच्या खालीं ही कविता लिहिली आहे, असे बाजारांत विकण्यांत येऊं लागले. शेवटीं एक दिवस हा फोटो विद्यासागरांच्या दृष्टीस पडला. त्यांस ही कविता फार आवडली. ते विनोदानें म्हणाले, मी श्रीमान् म्हणजे सुंदर आहेंच कारण माझें तोंड कुरूप झालें आहे! मी तर त्या ओरिसा ब्राह्मणांप्रमाणें दिसतों. (हे ओरिसा ब्राह्मण स्वयंपाकी म्हणून ठेवण्यांत येत. त्यांच्या डोक्यावर शेंडीचा एक घेरा असे. विद्यासागर यांच्या डोक्यावर अशा प्रकारची शेंडी होती म्हणून हें साम्य). ब्राम्हण कुळांत जन्मलेला आहें! आणि मूर्तिमान् दैवत म्हणजे मूर्तिमान् पूर्व जन्मांतील कर्में- कर्मांसारखें अन्य मोठें दैवत नाहीं. यामुळें तर हे सगळे माझे धिंडवडे चालले आहेत. नानाप्रकारचे दुःखोपभोग घेतों आहें अशा प्रकारें कवितेचा अर्थ करून ते हसले. परंतु मग गंभीरपणें म्हणाले, "तुम्ही माझ्यावर प्रेम करतां हें पुष्कळ आहे. यानें मला आनंद आहे, कृतार्थता आहे, परंतु मला देवबीव करूं नका, मी साधा तुमच्यासारखाच एक माणूस आहें झालें."

शहरांतील मोठे मोठे प्रतिष्ठित लोक ज्याप्रमाणें विद्यासागर यांस देव मानूं लागले, तसें खेड्यांतील जनतेचेंही होतें. विद्यासागरांची कीर्ति या लोकांच्या कानांवर केंव्हांच गेली होती. "सूरतसे कीरत बडी, बिनपंख उड जाय" या तुळसीदासजींच्या उक्तीप्रमाणें कुरूप विद्यासागरांची शुभ्र कीर्ति कॅंव्हांच दशदिशांत पसरली होती. एकदां ते एका खेड्यांत गेले. त्यांस पाहावयासाठीं लोकांच्या झुंडी लोटल्या. वृद्ध,-लहान, नारी-नर सर्वांचे घोळके जमले.

त्या समूहांत एक मोठी पोक्त बाई होती; ती फार उतावीळ झाली व म्हणूं लागली, "आहेत तरी कोठें ते विद्यासागर? मला मेलीला अजून दिसतही नाहींत." तेव्हां तिच्या जवळच्या एका इसमानें तिला विद्यासागर दाखविले. "इश्श, हेच का ते मोठे गाजलेले विद्यासागर; ढोपरपंचा नेसलेला आहे; आणि दिसतो तर भुतासारखा; मुळींच पाहावेंसें वाटत नाहीं यांना." असें म्हणून ती बाई मोठ्या फणकाऱ्यानें निघून गेली. विद्यासागर यांचा पोषाख साधा असे. एक पंचा व अंगावर एक उपरणें म्हणजे झालें.

योग्य माणसास ईश्वरचंद्र नेहमीं समाजांत पुढें आणावयाचे. नाहीं तर समाजांत ज्यांच्यांत मोठी कर्तबगारी नाहीं, असे लोकही मोठ्या जागेवर आढळतात. कालीप्रसादसिंह हे एक श्रीमंत गृहस्थ होते. महाभारताचें सुंदर बंगाली भाषांतर यांनीं करविलें. हिंदु पेट्रियट हें वृत्तपत्र यांच्याच मालकीचें होतें. याची व्यवस्था ठेवण्यास, कोण संपादक नेमावे वगैरे काम ते विद्यासागर यांस सांगत. हरिश्चंद्र मुकर्जी हे प्रथम या वृत्तपत्राचे संपादक होते. हे फार तरतरीत व हुशार होते. कर्तबगार असून लवकरच हे लोकांच्या शिरीं शोभतील असें वाटत होतें. परंतु दैववशात् ते लवकरच आपलें कार्य सोडून देवाच्या घरीं गेले. आतां दुसरा संपादक कोण नेमावयाचा? विद्यासागर यांनी कृष्णदास पाल यांस ती जागा दिली. कृष्णदास हे मोठे मनुष्य होते. त्यांनीं आपली जबाबदारी नीट पार पाडिली.

एकदां कर्जमुक्त व्हावें म्हणून विद्यासागर ह्यांनीं आपल्या छापखान्यांतील $\frac{1}{3}$ भाग विकला. त्यांच्याजवळ दोन छापखाने होते. एक स्वतःच्या मालकीचें संस्कृत यंत्र ( प्रेस ) नी दुसरें त्यांच्याकडे गहाण पडलेलें यंत्र. स्वतःच्या छापखान्यांतील $\frac{1}{3}$ भाग त्यांनीं विकला. पुढें त्यांस असें दिसून आलें कीं, हा जो गहाण छापखाना आहे, त्याची नीट व्यवस्था नाहीं. त्यांस स्वतः आतां देखरेख करतां येत नव्हती, यामुळें हा छापखाना पण विकून टाकावा असा विद्यासागर विचार करीत होते. व्रजेंद्रनाथ मुकर्जी म्हणून एक तरुण गृहस्थ होते. ते विद्यासागरांकडे आले आणि म्हणाले, 'माझ्या ताब्यांत जर हा 'प्रेस'-छापखाना दिलात, तर जेणेंकरून आपणांस संतोष व समाधान होईल अशा प्रकारची व्यवस्था मी राखण्याची शक्य ती खटपट करीन.' विद्यासागरांनीं मोठ्या आनंदानें ही गोष्ट मान्य केली. आतां तो छापखाना व्रजेंद्रनाथाच्या देखरेखीखालीं आला. परंतु ईश्वरचंद्रांनीं मनानें तो त्यांसच कायमचा देऊन

टाकला. व्रजेंद्रनाथ मुकर्जी खर्चवेच जातां उरलेले पैसे विद्यासागरांकडे घेऊन आले. विद्यासागर म्हणाले, 'नको; मला त्यांतील पैही नको; मीं तो छापखाना तुला दिला आहे. त्याची जरी २०००० रु. किंमत असली, तरी सुद्धां मी पै घेणार नाहीं. सर्व छापखाना मीं तुला दिला आहे. विद्यासागरांच्या उदारपणाला सीमाच नव्हती.

याच सुमारास त्यांनीं सरकारचे कांहीं पैसे कर्जाऊ म्हणून देऊन टाकले. ४९११–५–१ इतकी रक्कम त्यांनीं सरकारांत भरली. ही रक्कम कशासाठीं विद्यासागरांस देण्यांत आली होती, याचा सरकारजवळ जमाखर्च नव्हता, परंतु विद्यासागर म्हणाले, हें सरकारचें मला देणें आहे. कदाचित् शाळा वगैरे स्थापण्यास सरकारनें ही मदत पूर्वीं दिली असेल. यंग साहेबानें शाळांच्या खर्चाचा हिशोब झिडकारला व नामंजूर केला. तर पूर्वीं दिलेली तरी सरकारी मदत कशास पाहिजे, हें एक प्रकारचें कर्जच झालें ! कदाचित् अशा भावनेनें सव्याज रक्कम विद्यासागरांनीं परत केली असेल. सरकारजवळ हिशेब नव्हते तरी सरकारनें ही रक्कम स्वीकारिली. देणाऱ्यानें मोठेपणा दाखविला तर घेणाऱ्यानें नको का दाखवावयास ? परंतु आमच्या सध्यांच्या सरकाराला इतका मनाचा मोठेपणा आहे कोठें ?

अशा प्रकारचा विद्यासागरांचा आयुष्यक्रम चालला होता. लोककल्याण हा त्यांचा एकमेव व्यवसाय होता. परंतु त्यांची प्रकृति त्यांचे वडील निवर्तल्यापासून चांगली नव्हती, ती दिवसेंदिवस जास्त बिघडत चालली. विद्यासागरांस फार पूज्य मानणारे चण्डीदास हे एकदां त्यांना म्हणाले, "आपण कलकत्ता सोडून दुसरीकडे कां जाऊन राहात नाहीं ? येथें आपली प्रकृति नीट राहात नाहीं." विद्यासागर हा प्रश्न ऐकून एकदम रडूं लागले व म्हणूं लागले, "अहो मी गेल्यावर या माझ्या लोकांना मदत कोण करील ? शेंकडों लोकांस माझी नियमानें मदत मिळते, कोणास चार आणे, कोणास आठ आणे, कोणास रुपया, कोणास पांच रुपये याप्रमाणें महिना माझे ८०० रुपये केवळ यासाठीं खर्च होतात. आतां कदाचित् मला दुसऱ्याच्या स्वाधीन पैसे करून जातां येईल. एखाद्या गृहस्थास या सर्व लोकांची व्यवस्था लावावी असें पैसे देऊन सांगितलें म्हणजे झालें असें तुम्ही म्हणाल, परंतु हा प्रयत्न अगदीं फुकट व व्यर्थ आहे असें मला अनुभवांतीं कळलें आहे.

६

मागें मी एकदा परगावास गेलों होतों. एका गृहस्थाजवळ २५०० रु. या दानधर्मासाठीं देऊन ठेविले. परंतु मी जेथें गेलों होतों तेथें येथील माझ्या लोकांचीं पत्रांवर पत्रें मदतीसाठीं येऊं लागलीं. माझ्यानें तिकडे राहवेना. मीं आल्यावर त्या गृहस्थास विचारिलें, "आपणांजवळ मी पैसे देऊन गेलों होतों, तरी आपण ते त्या लोकांस कां दिले नाहींत?" "माझ्या कामासाठीं मीं खर्चे केले; माझा नाइलाज झाला. मी मोठ्या आपत्तींत पडलों होतों." असें उत्तर त्या गृहस्थानें मला दिलें. मीं २५०० रुपये कर्जाऊ काढले व माझ्या लोकांस मदत करूं लागलों. परंतु त्या गृहस्थानें माझें पैसे अद्याप परत केले नाहींत. अशा प्रकारची आपल्या लोकांची स्थिति. मग मी परगांवीं कसा जाऊं? यांचीं दुःखें कोण निवारण करील?" विद्यासागरांचे हे शब्द ऐकून चण्डीदास यांस गहिंवरून आलें व "केवढा थोर पुरुष" असें शब्द त्यांच्या तोंडावाटें बाहेर पडले.

विद्यासागर कधीं कधीं खर्माटाड नांवाच्या प्रांतीं आपल्या बंगल्यांत राहावयास जात. खर्माटाड हा प्रांत किंवा परगणा बिहारमध्यें आहे. येथें संताळ लोक राहातात. या संताळांस नाना प्रकारची मदत विद्यासागर करावयाचे. आपल्या बंगल्याभोंवतालच्या बागेची काळजी घ्यावयास त्यांनीं एक नोकर ठेविला होता. हा फार प्रामाणिक होता व विद्यासागर यांचा त्याच्यावर लोभ जडला. विद्यासागरांचा मुलगा नारायण हा त्यास लिहावाचावयास शिकवी. विद्यासागरांनीं पुढें त्याचें लग्न सुद्धां स्वतःच्या खर्चानें करून दिलें. या संताळ लोकांस जेऊं खाऊं घालावें, त्यांस कपडेलत्ते द्यावे असा विद्यासागरांचा येथील क्रम होता. यामुळें त्या सर्व संताळ लोकांचें विद्यासागरांवर फार प्रेम व भक्ति जडली. विद्यासागर आले कीं हे सर्व संताळ लोक कांहींना कांहीं चीज घेऊन त्यांस भेटावयास येत. कोणी सुंदर व सुगंधी रानफुलें आणीत. एकदां एका संताळानें एक कोंबडी विद्यासागरांस भेट म्हणून आणली. विद्यासागर कोंबडी कशी घेणार? बंगाली ब्राह्मण मासे सेवन करितात; परंतु इतर मास ते सेवन करीत नाहींत. जेव्हां विद्यासागर कोंबडी घेतना. तेव्हां तो संताळ रडूं लागला. "महाराज, आपण आलांत व माझ्याजवळ दुसरें तिसरें कांहीं नव्हतें; म्हणून ही एक कोंबडी मात्र होती तेवढी आणली; तिचाही आपण स्वीकार करीत नाहीं, तेव्हां दुर्दैव माझें. माझें भाग्य नाहीं आपणांस कांहीं अर्पण करण्याचें, दुसरें काय?" हे संताळाचे शब्द ऐकून

दयासागर हेलावला व विद्यासागरांनीं ती कोंबडी ठेवून घेतली व मग त्या संताळास न कळत ती दुसऱ्यास देऊन टाकिली.

राजेरजवाडे यांचा सुद्धां विद्यासागरांवर विश्वास. टिळक हे ज्याप्रमाणें जगन्नाथमहाराजांच्या इस्टेटीसाठीं जपले व अलौलिक मित्रप्रेम दाखविते झाले, त्याप्रमाणें कांदी संस्थानच्या राणीचा कारभार ईश्वरचंद्रांनीं पाहिला. राणीचा मुलगा लहान होता. कोर्ट ऑफ वार्डच्या ताब्यांत हें संस्थान देऊन सरकार कांहीं युरोपीय व्यवस्थापक तेथें ठेवणार होते. परंतु विद्यासागर यांनीं खटपट करून राणीचा कारभार आपल्या हातीं घेतला व अत्यंत काळजीपूर्वक सर्व कारभार त्यांनीं पाहिला.

विद्यार्थ्यांच्या चळवळींत ते विशेष भाग घेत नसत. विद्यार्थ्यांबद्दल प्रेम त्यांच्या मनांत फार असे. ते मेट्रापॉलिटन संस्थेचे तर जीव होते. परंतु एकदां एक विशेष प्रसंग घडून आला. कलकत्त्याच्या मेडिकल कॉलेजचे प्रिन्सिपाल यांनीं बंगाली विद्यार्थ्यांस उद्देशून कांहीं अपशब्द उच्चारले. 'खोटें बोलणारे, लफंग्ये, फसव्ये, अप्रामाणिक, आंतल्या गांठीचे' वगैरे· मेकॉलेसाहेबांनीं जी पूजा बंगालीबाबूंची केली, त्याच वाक्पूजेचा पुनरुद्धार या प्रिन्सिपालसाहेबांनीं केला. मेडिकल कॉलेजमधील विद्यार्थ्यांनीं संतापून संप केला. विजय गोस्वामी यांनीं या विद्यार्थ्यांचें पुढारीपण स्वीकारलें होतें. गोलगोल दिघी घाटावर विद्यार्थ्यांची प्रचंड सभा भरली. या घाटावर विद्यासागर यांचा अर्ध-पुतळा सध्यां शोभत आहे. या सभेस आपण अध्यक्ष व्हा अशी विद्यसागरांस विद्यार्थ्यांनीं विनंती केली. विद्यासागर अध्यक्ष झाले. तुम्ही "पुनः कॉलेजमध्यें जा; कशाला प्रकरण उगीच चिघळवितां?" असें विद्यासागर मुलांस म्हणाले. परंतु विजय गोस्वामी यानें विद्यासागरांचें मन वळविलें. सर्व राष्ट्राची बदनामी ज्यानें केली, त्यानें क्षमा मागितली तरच आम्हीं कॉलेजमध्यें जाणें योग्य होईल. असें सांगून त्यानें विद्यासागरांची समजूत घातली. विद्यासागर यांनीं लेफ्टनंट गव्हर्नरांची भेट घेऊन प्रकरण तडीस न्यावें असें ठरलें. विद्यासागर हे गव्हर्नरांकडे गेले; त्यांनीं प्रिन्सिपाल यांस बोलाविलें. नंतर उभयतां बोलणीं होऊन विद्यासागर यांनीं विद्यार्थी व प्रिन्सिपाल यांचा समेट कॉलेजमध्यें करून द्यावा, असें ठरलें. मेडिकल हॉलमध्यें सभा भरली. तेथें क्षमा मागणें-वजा भाषण प्रिन्सिपॉलनीं केलें, त्यांनीं दिलगिरी प्रदर्शित केली. ही क्षमा जाहीररीत्या मागावयास ते तयार नव्हते एवढेंच. विद्यासागरांनीं लहानसें

भाषण करून सर्वांचा सलोखा घडवून आणला, हा विजय गोस्वामी विद्यार्थी पांच वर्षे शिकला, परंतु शेवटल्या वर्षी त्यानें कॉलेज सोडलें व तो विरक्त झाला. पुढें विजय गोस्वामी हें साधु झाले. चित्तरंजन दासांचे हे गुरु होते. ( आध्यात्मिक गुरु ) विजय गोस्वामीबद्दल विद्यासागर यांचा फार अनुकूल ग्रह झाला व ते त्यास मनांत मोठा मानीत.

विद्यासागरांस स्वतः दुःख झालें तरी तें दुःख इतरांस कदापि दाखवीत नसत. त्यांची सहनशक्ति फार लोकोत्तर होती; इच्छाशक्ति दांडगी होती. जनकाप्रमाणें ते स्थितप्रज्ञ होते. जनकराजाची अशी गोष्ट सांगतात कीं, एक हात अग्नीमध्यें ठेवून दुसऱ्या हातानें तो भोजन करी. देह ही लांकडाची मोळी आहे हें तो जिवंतपणीं दाखवी. विद्यासागर यांच्या अंगावर मोठमोठीं वाळकें येत. एकदां त्यांच्या पाठीवर एक मोठें थोरलें वाळूक आलें होतें. तें कापून टाकावयाचें होतें. म्हणून एकदां एक डॉक्टर विद्यासागरांकडे आला होता. त्याच वेळेस विद्यासागरांकडे कोणी दोघे भाऊ आपली मालमत्ता कशी वांटावी हें ठरविण्यासाठीं आले होते. विद्यासागर हे मध्यस्थ किंवा पंच होते. विद्यासागर या आलेल्या बंधुद्वयाजवळ बोलत होते व डॉक्टर पाठीवर शस्त्रक्रिया करीत होता. शस्त्रक्रिया संपली, परंतु विद्यासागरांचें तिकडे लक्षही नव्हतें. किती सहनशीलता ! 'सुखदुःखे समेकृत्वा' असें जीवन चालविणारे विद्यासागर स्थितप्रज्ञच नव्हेत तर काय म्हणावयाचें?

आतां विद्यासागर वृद्ध झाले. मनाचा उत्साह पूर्ववत् असला तरी शरिरांत त्राण राहिलें नव्हतें. १८८८ मध्यें त्यांची पत्नी निघून गेली. संसाररथाचें एक चाक मोडून गेलें. "आतां एकच चाक राहिलें. आतां आणखी किती दिवस जगावयाचें" असें विद्यासागर म्हणूं लागले. त्यांना एक वर्षभर अतिसारापासून त्रास होत असे. हाच रोग पुढें बळावला. या रोगास विषूचिका असें म्हणतात. एक प्रकारचा अतिसारच तो. शेवटीं खंगत खंगत विद्यासागर इसवी सन १८९१ मध्यें इहलोक सोडून निघून गेले. गरिबांचा कैवारी, दुःखितांचा आधार, सरकारचा सल्लागार, विद्वानांचा अग्रणी, विद्यार्थ्यांची कामधेनू, विश्वाचा सखा हा लोक सोडून निघून गेला. मरणापूर्वी थोडेच दिवस सरकारनें सी. आय्. ई. ही पदवी देऊन स्वतःची गुणज्ञता शेवटीं तरी व्यक्त केली व स्वतःचा गौरव करून घेतला. त्या दिवशीं सर्व कलकत्ता शहरांतील बाजार बंद होता. शाळा, महाशाळा, सरकारी कामें सर्व बंद

होतीं. मोठी मिरवणूक निघाली. श्रीमंत गरीब, लहान थोर सर्व प्रेतयात्रेस होते. स्त्रियांनीं फुलें, गुलाबपाणी फेकलें. गरीब लोक तर धायींधायीं रडले. अशा सर्व जनतेच्या अश्रुपुरांत विद्यासागरांच्या देहास अग्नि देण्यांत आला. विद्यासागरांचा पार्थिव भाग गेला, परंतु त्यांचीं सत्कृत्यें, त्यांचे सद्गुण हीं जगांतून कधींही जाणार नाहींत. तीं सदैव लोकांस उन्नत करतील, उदार करतील, यांत शंका नाहीं. सगळीकडून दुखवट्याचे संदेश आले. स्मारकें झालीं. कोणीं शिष्यवृत्त्या ठेवल्या. कोठें अर्ध-पुतळे उभारण्यांत आले. बेथून संस्थेंतील विद्यार्थिनींनीं फंड जमवून विद्यासागरांच्या नांवें शिष्यवृत्ति ठेविली. अशीं स्मारकें लोक करूं लागले. या बाह्य स्मृतीपेक्षां खरी स्मृति ही आंतरिक असते; आणि बंगाली जनतेंत राममोहनराय यांच्या खालोखाल विद्यासागरच पूज्य मानले जातात हें साहजिकच आहे. विद्यासागर यांचें राहातें घर, जेथें ते बसत उठत, जेथें अनेकांस त्यांनीं साहाय्य केलें, तें त्यांचें कलकत्त्यांतील भव्य घर, जेथें त्याचें वाचनालय व ग्रंथालय होतें तें घर। पुढें लिलावांत विकलें जाणार होतें. परंतु एका हिंदी व्यापारी कंपनीनें तें घर विकत घेऊन आपला 'स्टोअर' तेथें उघडला आहे. हें घर अद्याप कलकत्त्यांत उभें आहे.

विद्यासागरांच्या खेड्यांतील जळलेल्या घराचे अवशेष अद्याप दिसतात व लोक प्रेमानें व दुःखानें ते दाखवितात.

विद्यासागर यांनीं आपलें मृत्युपत्र मरणापूर्वीं कांहीं वर्षें लिहून ठेविलें होतें. त्यांतील कांहीं ठळक गोष्टी येथें सांगतों. त्यांनीं आपल्या इस्टेटीची व्यवस्था ट्रस्टींकडे सोंपविली होती.

### दरमहाच्या देणग्या

१०० — खेडेगांवची मातृभूमींतील शाळा.
५० — तेथील दवाखान्यास.
१०० — विधवा पुनर्विवाह फंड.
३११ — इतर शैक्षणिक संस्था वगैरे.

———

५६१ रुपये महिना इस्टेटीमधून घ्यावेत.

माझे नोकर मी मरेपर्यंत माझ्या घरांत राहिले तर त्यांस प्रत्येकीं ३०० रुपये एकदम द्यावे. यांतील नोकरांचीं नांवें:—

१ जगन्नाथ चतर्जी, २ गोविंदचंद्र गूड, ३ उपेंद्रनाथ पालित अशीं होतीं.

दुसरे ६ इसम आहेत. त्यांस सर्वांस मिळून मी १०५ रुपये देतों. त्यांस ही रक्कम चालू ठेवावी असें ट्रस्टींस वाटलें तर त्यांनीं चालू ठेवावी, नाहीं तर बंद करावी. माझ्या इस्टेटीचा कोणताही भाग विकण्यास ट्रस्टींस परवानगी आहे." आपल्या मुलींस, मुलांस व भावांस कांहीं पुस्तकांचे हक्क त्यांनीं दिले. ईशान हा धाकटा भाऊ, त्यांस त्यांनीं बरेंच दिलें होतें.

---

## प्रकरण ११ वें

# ईश्वरचंद्रांचा गुणगौरव

ईश्वरचंद्रांचा गुणगौरव किती करावा ? त्यांचे गुण मीं पामरानें वर्णावे तरी किती ? परंतु पवित्रांचें गुणवर्णन करून मलिन मन निर्मळ होतें. पावित्र्याच्या संगतींत मनोदुर्बलत्व दुरावून मन प्रबळ व मोहादिकांस मारण्यास तयार होतें. म्हणून त्यांच्या गुणांचा अल्पमतीप्रमाणें येथें विस्तार करण्याचें योजिलें आहे. ईश्वरचंद्रांच्या अनेक गुणांत जर पटकन् लक्षांत येण्यासारखा, डोळ्यांत भरण्यासारखा कोणता गुण असेल तर तो परोपकार–बुद्धि हा होय. किती परोपकाररत बुद्धि ! ईश्वरचंद्रांची ही भूतदया, ही निरपेक्ष प्राणिमात्रावरील प्रेमवृत्ति पाहिली म्हणजे मला एकनाथांची आठवण होते. त्यांच्यासारखे लोक जगांत किती असतील हा प्रश्न डोळ्यांसमोर उभा राहातो. स्वार्थांत लडबडून राहाणाऱ्या असंख्य जीवांत असा थोर पुरुष मोठ्या भाग्यानें निर्माण होत असतो. ईश्वरचंद्रांची परोपकारता निस्सीम होती. वाचकांच्या मनावर बिंबविण्यासाठीं मी त्यांच्या आयुष्यांतील कांहीं कथा देतों. या कथा दंतकथा नाहींत; प्रत्यक्ष घडलेल्या या गोष्टी आहेत. १९ व्या शतकांत होऊन गेलेल्या सत्पुरुषांच्या या आयुष्यांतील कथा आहेत. प्राचीन काळांतील शिबी–श्रियाळावर आपला विश्वास नसेल; या व्यक्ति कल्पनासृष्टींत निर्माण झाल्या असें कोणी म्हणेल, परंतु ईश्वरचंद्रांचें तसें नाहीं. ईश्वरचंद्र खरोखरचे गेल्या शतकांत होऊन गेलेले थोर पुरुष. त्यांसंबंधीं संशय घेण्यास कोणास जागा नाहीं. त्यांच्या उदारपणाचीं मागील प्रकरणांत कांहीं उदाहरणें आलींच आहेत. परंतु आणखी कांहीं येथें देतों.

एकदां कलकत्ता शहरांत कॉलऱ्याची सांथ आली होती. हजारों लोक मरत होते. पुष्कळ लोकांस औषधोपचार वगैरे पोंचण्याची मारामार. एक दिवस काय झालें, पहांटेच्या सुमारास विद्यासागर कोठें तरी बाहेर जात होते, तों रस्त्यांत एका कंदिलाजवळ त्यांस काय आढळलें? एक मेहतर एका दिव्याच्या खांबाजवळ पडलेला होता. त्याची दशा फार कष्टमय झाली होती. त्याच्याजवळ कोणी चिटपांखरूं सुद्धां नव्हतें. ईश्वरचंद्र त्याच्याजवळ गेले. त्यांनीं त्याच्या अंगास हात लावला तर सडकून ताप भरलेला. त्यांनीं एक क्षणाचाही मनांत विचार न करतां मेहतरास खांद्यावर घेतलें व ते आपल्या घरीं आले. ईश्वरचंद्र फार सशक्त होते हें मागें सांगितलेंच आहे. मेहतरास घरीं आणल्यावर त्यास बिछान्यावर त्यांनीं निजविलें. त्याच्या अंगांत स्वच्छ व उबदार कपडे घातले आणि डॉक्टरास बोलावणें धाडलें. डॉक्टर आला. त्यानें प्रकृति वगैरे पाहून औषधोपचार केले. पुढें कांहीं दिवसांनीं मेहतर बरा झाला. ईश्वरचंद्रांच्या प्रयत्नांस यश आलें. पंधरा दिवसांनीं मेहतर आपल्या घरीं गेला. जातांना ईश्वरचंद्रांनीं त्यास कपडे वगैरे देऊन सांगितलें कीं, "जर तुला कांहीं उणें पडलें तर मला ताबडतोब कळवीत जा. मनांत संकोच मानूं नकोस." विद्यासागरांचें हें भूतप्रेम एकनाथांनीं महाराचें वाळवंटांतील पोर उचलून घेतलें, त्याच्या बरोबरीचें नाहीं काय?

दुसऱ्या एका मेहतराची अशीच गोष्ट आहे. तो विद्यासागरांकडे आला व म्हणाला, "महाराज माझी बायको आजारी आहे, आपण याल तर बरें होईल." रात्रीची वेळ होती तरी ताबडतोब ईश्वरचंद्र गेले. ईश्वरचंद्रांस होमिओपाथीचें ज्ञान होतें. त्या ज्ञानाचा ते पुष्कळ वेळां उपयोग करीत व रोग्यांस गुणही येत असे. परोपकार करणाऱ्यांस वैद्यकीचें ज्ञान असणें फार आवश्यक आहे. मेहतराच्यां बायकोस जेव्हां बरें वाटूं लागलें, तेव्हां विद्यासागर घरीं आले व तिच्या औषधपाण्याची त्यांनीं व्यवस्था केली.

बंगालमध्यें अनावृष्टीनें नव्हे तर अतिवृष्टीनें पुष्कळ वेळां दुष्काळ पडतात, मोठमोठ्या नद्यांस पूर येतात व शेंकडों गांवें जलमय होऊन हजारों लोक भिकेस लागतात. असाच एकदां एक मोठा दुष्काळ पडला होता. विद्यासागर यांनीं या दुःखितांच्या अन्नवस्त्रासाठीं पाण्यासारखा पैसा खर्च केला. एका खेड्यांत जाऊन ते स्वतः राहिले व सर्व दुष्काळग्रस्तांना अन्न मिळावें

यासाठीं त्यांनीं तेथें अन्नसत्र घातलें. दुष्काळांत सांपडलेले सर्व लोक तेथें यावयाचे. या लोकांस रोज खिचडी खावयास मिळे. एक दिवस कांहीं दुष्काळग्रस्त लोक विद्यासागरांकडे आले व म्हणाले, " महाराज, या खिचडीचा आतां अगदीं वीट आला; कांहीं तरी खाण्यांत पालट करा. उद्यां आम्हांस भात, भाजी असें अन्न द्याल का ?" विद्यासागर कळवळले व म्हणाले, ' होय, उद्यां तुम्हांस तुमच्या इच्छेप्रमाणें भोजन मिळेल.' दुसऱ्या दिवशीं भात, भाजी वगैरेचा बेत होता. स्वयंपाक झाला, पंक्ती मांडल्या गेल्या. पोटाची दामटी वळलेले, पाठपोठ एक झालेले असे बुभुक्षित लोक आपआपल्या पात्रांवर बसून राहिले. अन्न वाढण्यांत आलें. भात वाढून झाला, अद्याप भाजी वाढावयाची होती. परंतु ती येण्यास जरा अवकाश होता. एका मनुष्यास धीर धरवेना. त्यानें कोरडाच भात भराभरा तोंडांत कोंबला व घशास घास लागून तो गुदमरून तेथेंच मरण पावला. विद्यासागर धांवत आले. परंतु करणार काय ? विद्यासागर सारखे रडत राहिले. " आपण कालवण वाढावयास उशीर लाविला; परंतु आतां बोलून काय फायदा; " असा विलाप विद्यासागर यांनीं चालविला. पुष्कळांनीं त्यास समजाविलें. परंतु त्यांचें सांत्वन होईना. या गोष्टीचें जेव्हां जेव्हां त्यांस स्मरण होई, तेव्हां तेव्हां ते सद्गदित होत.

विद्यासागर हे अनाथांचे नाथ, दुर्बलांचे वाली. ज्यांस दुसरीकडे आधार नाहीं त्यांस त्यांच्याजवळ तरी आधार मिळावयाचा. ते गरिबांची कल्पवल्ली होते, कामधेनु होते. एकदां कलकत्त्यास एक पोलिस-सब-इन्स्पेक्टर होता. त्याच्यावर कांहीं आरोप आला होता. तो पोलिस-सब-इन्स्पेक्टर सच्चा होता. त्याच्यावर आरोप आला खरा; परंतु त्यांतून मुक्त होण्यासाठीं बॅरिस्टर देणें जरूर होतें. पोलिस-सब-इन्स्पेक्टरनें एक बॅरिस्टर मिळविला. त्यास रोज ७०० रुपये द्यावयाचें त्यानें कबूल केलें. घराहून पैसे येतील अशी पोलिस-सब-इन्स्पेक्टरनें व्यवस्था केली होती. परंतु दैववशात् पैसे वेळेवर आले नाहींत. उद्यांची कोर्टांतील तारीख. बॅरिस्टरास पैसे तर उद्यां दिले पाहिजेत. पैसे तर घराहून आले नव्हते. बॅरिस्टर मिळाला नाहीं तर खटला बुडणार. मग आपणांवर कदाचित् आरोप शाबीत होणार व सर्वत्र नाचक्की होऊन पोटावर पाय येणार असें त्याच्या मनांत आलें. काय करावें हें पोलिस-सब-इन्स्पेक्टरास सुचेना. संकटांत साधारण मनुष्य त्रस्त होतो; त्याची बुद्धि

मंद होते; विचार अस्तंगत होतो. सब-इन्स्पेक्टरचा एक मित्र विद्यासागर यांचा मित्र होता. हा सब-इन्स्पेक्टरास घेऊन विद्यासागरांकडे आला. सब-इन्स्पेक्टर विद्यासागरांस म्हणाला, 'महाराज, आपली व त्या बॅरिस्टरांची पूर्वीची चांगली ओळख आहे. तर आपण जर त्यांस चिट्ठी दिलीत तर ते माझ्याजवळून तावडतोब पैसे मागणार नाहींत. मी सात दिवसांत पैसे परत देईन, तर आपण त्यांस धीर धरण्यास सांगा. आपल्या शब्दास लोक वेद-वाक्याप्रमाणें मानतात.' विद्यासागर यांस काय करावें हें समजेना. बॅरिस्टर पूर्व-काळीं त्यांच्या ओळखीचा होता. परंतु इंग्लंडांतून आल्यापासून विद्यासागर त्यांच्याकडे एकदांही गेले नव्हते. असें असल्यामुळें त्यांस असें पत्र लिहिणें म्हणजे सभ्याचाराचा भंग होतो असें वाटलें. विद्यासागर म्हणाले, 'छेः माझ्याच्यानें हें काम होणार नाहीं. माझा व त्या गृहस्थाचा नीट परिचय नसल्याकारणानें ही गोष्ट मी कशी बरें करूं?' ईश्वरचंद्रांचे हे शब्द ऐकून सब-इन्स्पेक्टर फार खिन्न झाला. तो रडवेला झाला. सद्गदित होऊन तो म्हणाला, 'मी आजपर्यंत ऐकत होतों कीं ज्याला जगांत कोठें आधार नाहीं, त्यानें आपणांकडे यावें, कां तो सनाथ झालाच. आपली कीर्ति ऐकून अशरण असा मी आपल्या पायांकडे धांवत आलों. आपणही आश्रय देत नाहीं, तर माझें दुर्दैव पुरेंच ओढवलें. आईनें मुलास दूर लोटावें, वासरास गाईनें लाथ मारावी, पाडसास कुरंगीनें पिटाळून लावावे, तसेंच नाहीं का हें? असो. आपली मर्जी. माझेच नशीब; नाहीं तर आपणांसारखेही आज पाठमोरें कां व्हावे?' सब-इन्स्पेक्टराचे हे केविलवाणे शब्द ऐकून विद्यासागर विरघळले. त्यांचे लोण्याप्रमाणें मऊ मन वितळलें. पत्र लिहावयास त्यांनीं हातीं कागद तर धरला आणि पत्रांत 'प्रिय बॅरिस्टरसाहेब' एवढेच शब्द त्यांनीं लिहिले; परंतु पुढें त्यांच्यानें कांहीं एक जास्त लिहवेना. 'मी कसें त्यांस लिहूं' हा प्रश्न पुनरपि डोळ्यांसमोर उभा राहून ते म्हणाले, 'नाहीं; मला लिहितां येत नाहीं. मला या बाबतींत कांहींच करतां येत नाहीं.' इन्स्पेक्टरच्या मनांत फोंफावणाऱ्या आशावल्लीवर वीज कोसळली. हताश होऊन खिन्नवदन होऊन तो जावयास निघाला. दरवाज्याबाहेर इन्स्पेक्टर जाणार तों त्यास पुनरपि विद्यासागरांनीं हांक मारली. विद्यासागर हे घरांत गेले. एक ७०० रुपयांचा चेक त्यांनीं त्या सब-इन्स्पेक्टरच्या हवालीं केला व म्हणाले, 'हा चेक त्या बॅरिस्टरास द्या आणि दुपारीं ३॥ वाजल्यानंतर बँकेंत जाऊन हा वटवण्यास

सांगा. तोंपर्यंत मी ७००.रुपये तेथें भरून ठेवण्याची व्यवस्था करितों. कारण माझ्या नांवावर सध्यां मुळींच पैसे नाहींत.' इन्स्पेक्टर पुन्हां आनंदी दिसूं लागला. आपले पैसे मी तुरुंगांत गेलों नाहीं तर ७ दिवसांचे आंत आणून देईन असें ईश्वरचंद्रांस सांगितलें. सबइन्स्पेक्टर निघून गेले. ईश्वरचंद्रांनीं ७०० रुपये दुसऱ्याकडून घेऊन बँकेंत नेऊन भरले व बॅरिस्टरसाहेबांस ती रक्कम मिळाली. बॅरिस्टरांनीं खटला चालविला व हे सबइन्स्पेक्टर निर्दोषी होऊन सुटले.

खटला होऊन गेल्यास आज ४ था दिवस होता. ईश्वरचंद्र आपल्या दिवाणखान्यांत बसले होते. इतक्यांत सबइन्स्पेक्टर व त्याचा मित्र दोघे विद्यासागरांकडे आले. 'कां आलां? सर्व ठीक आहेना?' असें विद्यासागरांनीं विचारलें. 'हो सर्व कुशल आहे. आपल्या कृपेनें दोषमुक्त झालों; आणि आज आपले पैसे घेऊन आलों आहें.' असें सबइन्स्पेक्टर म्हणाला. 'पैसे, कसले पैसे?' 'दोन दिवसांपूर्वी आपणांकडून नेले नव्हते का?' 'तर मग तुम्हीं मला फसविलेंत; माझ्यासारख्या माणसास तुम्ही फसवावें?' विद्यासागर नंतर आपल्या मित्राकडे पाहून म्हणाले, 'आणि तुमच्यासारख्यांनीं माझी फसवणूक करावी?' विद्यासागर काय बोलतात याची त्या उभयतांस कल्पनाच होईना. शेवटीं विद्यासागर पुन्हां म्हणाले, 'तुम्ही खरोखर पोलिस-सब-इन्स्पेक्टर आहांत का? छेः माझा त्याच्यावर मुळींच विश्वास नाहीं' "आपण जर येथून चार पावलें येण्याची कृपा कराल; तर आपली खात्री पटवून देतां येईल' असें विद्यासागरांचे मित्र म्हणाले. विद्यासागर म्हणाले, 'आजपर्यंत अनेक लोकांनीं मजजवळून पैसे नेले, ते सर्व सभ्य लोक होते. परंतु मुदत संपल्यावरही माझे पैसे परत आणून देण्याचें कोणास स्मरण राहिलें नाहीं. आपण तर पोलीस खात्यांतले. तेव्हां आपण पैसे परत आणून द्याल, आणि ते पुनः सात दिवसांचा करार असतां चवथ्या दिवशींच आणून द्याल, हें मला मुळींच विश्वसनीय वाटत नाहीं. आपण पोलीसखात्यांतील खात्रीनें नाहीं. शेवटीं विद्यासागरांची त्यांनीं खात्री केली व तिघेही मोठमोठ्यानें हंसले. विद्यासागर विनोदानें म्हणाले, "पोलिसखात्यांत असून असे सचोटीनें वागतां म्हणूनच तुमच्यांवर किटाळ आलें. पोलिसखात्यांत सच्चा माणूस चोर ठरतो व चोर वर मान करून मिरवतो. आपणांसारख्यांवर दोषारोप येणार नाहीं तर मग कोणावर येणार?" विद्यासागरांच्या बोलण्याची

यथार्थता उभयतांस अर्थातच पटली. त्या दोघांस विद्यासागरांनीं भोजनासाठीं राहावयास आग्रह केला. नंतर दुपारीं भोजनें वगैरे होऊन मग हे उभयतां निघून गेले. असे विद्यासागर होते बरें! किती असे हरीचे लाल जगांत असतील ?

या सर्व गोष्टींपेक्षां अत्यंत हृदयास हलवून सोडणारी, मनास चटका लावणारी गोष्ट म्हणजे बंगालचे प्रसिद्ध राष्ट्रीय कवि मायकेल मधुसूदन व विद्यासागर यांच्या परस्पर संबंधाची होय. मायकेल हे प्रख्यात नाटककार व कवि. हे आपल्या वडिलांचे एकुलते एक मुलगे. जात्या फार हुशार व तरतरीत. शाळेंत असतां भूदेव व मधुसूदन हे एका वर्गांत असावयाचे. परंतु सबंध विषयांच्या गुणांनीं मायकेल पुढें यावयाचे. मिशनरी लोकांचा त्या वेळेस फार सुळसुळाट असे. त्यांच्या जाळ्यांत अनेक लोक सांपडत. एका मिशनरी गृहस्थाच्या मुलीवर मायकेलचें प्रेम जडलें. तूं ख्रिश्चन झालास तर तुला ती मुलगी मिळेल असें त्यास स्पष्ट बजावण्यांत आलें. झालें. मनाचा विकार बलवत्तर असतो. मायकेल हिंदूचे ख्रिश्चन झाले. बापानें त्यांस घरांतून घालवून दिलें. 'एक पैही देणार नाहीं' असें बापानें निक्षून सांगितलें. एकुलता एक हुशार व सुंदर मुलगा. आईबापाचें हृदय कसें तिळतिळ तुटत असेल याची कल्पना आपणांस कशी येईल ? मायकेलनें पुष्कळ अभ्यास केला. ते उत्कृष्ट इंग्रजी लिहीत. मद्रासेंत जाऊन त्यांनीं कांहीं दिवस वर्तमानपत्रही चालविलें. पुढें ते सपत्नीक फ्रान्समध्ये गेले. फ्रान्समध्यें असतां एकदां त्यांची फार विलक्षण स्थिति झाली. परक्या देशांत पडलेले. ना स्नेही, ना सोबती. जवळचे द्रव्य सर्व संपलेलें. मुलेंबाळें भुकेनें काहूर करताहेत. अशा वेळीं परक्या देशांत कोणाजवळ पैशाची याचना करावी ? हिंदुस्थानांत तरी कोणास पत्र लिहावें ? बापाजवळ कुबेरासारखी संपत्ति आहे, परंतु त्यांच्याजवळ कोणत्या तोंडानें मागूं असे विचार मनांत येऊन मधुसूदन रडले. शेवटीं मायकेलनीं विद्यासागर यांस पत्र लिहिण्याचें ठरविलें. विद्यासागर हे कनवाळू आहेत, दुःखितांचीं दुःखें व अश्रु नाहींसे करणारे आहेत, असें त्यांनीं ऐकलें होतें. मायकेल मधुसूदन यांनीं जें पत्र त्यांस लिहिलें त्याचा सारांश असा.

"दोन वर्षांपूर्वीं मी तुम्हांस सोडून इकडे आलों; त्या वेळेस माझें हृदय आशेनें भरलेलें होतें; माझें मन खंबीर होतें. मी धीराचा माणूस होतों, परंतु मी अगदीं आज हतबल व निराश असा झालेला दुःखी प्राणी आहें, हें

ऐकून तुम्हांस जबर धक्का बसेल. येथें पुष्कळ लोकांशीं माझे संबंध आले. त्यांच्या निष्ठुर वागणुकीमुळें आज मी मोठ्या संकटांत पडलों आहें. त्यांच्या वर्तणुकीचें कोडें हें मला तर उलगडत नाहीं आणि ज्या लोकांच्या असल्या वर्तणुकीनें मी संकटांत आलों, त्यांतील एक तर माझा मित्र होता व माझ्यासाठीं झटेल असें मला वाटत होतें.

मला आज फ्रेंच लोकांच्या कारागृहांत जाणें प्राप्त झालें आहे. माझी पत्नी आणि मुलेंबाळें यांस उद्यां एखाद्या अनाथालयांत जाऊन आश्रयार्थ राहिलें पाहिजे, हिंदुस्थानांत ४००० रुपये माझे येणें आहेत; परंतु आज माझ्या हातांत तर कवडी नाहीं.

ज्या या कष्टद स्थितींत मी येऊन पडलों आहें, त्यांतून सोडविणारा तुमच्याशिवाय अन्य मित्र मला दिसत नाहीं. तुमचा अनंत उत्साह, व तुमचें धीरोदात्त अंतःकरण यांस जागें करा व माझ्या बाबतींत आवश्यक तें तावडतोब करा. एक दिवसही गमावूं नका. एक क्षण गमावणें म्हणजे माझें मरण आहे.

तुम्हांस जी तसदी देणार आहें, त्याबद्दल मी क्षमा मागूं का? परंतु असें करावेंसें मला वाटत नाहीं. तुमच्या स्वभावाची मला नीट ओळख आहे. परकीय देशांत तुमचा मित्र व देशबंधु अनाथापरी संकटांत खितपत पडलेला तुमच्या हृदयास कसा सहन होईल?

मीं फ्रान्स सोडून तर कोठें जाणें सध्यां शक्य नाहीं; म्हणून मला वरील पत्त्यावरच पत्र लिहा. देव वर आहे; तर मला सहाय्य करा."

अशा अर्थाचें पत्र विद्यासागरांच्या हातांत पडलें. विद्यासागर फार विव्हळले. परक्या देशांत पोराबाळांनिशीं हा मातबर घराण्यांतील तरुण अशा परिस्थितींत सांपडावा, या विचारानें त्यांस चैन पडेना. त्यांनीं एक क्षणही फुकट दवडला नाहीं. तावडतोब पत्र व १५०० रुपये विद्यासागर यांनीं मायकेल यांस त्यांच्या फ्रान्समधील पत्त्यावर पाठविलें. मेघाची चातकानें वाट पाहावी, सूर्याची चक्रवाकानें, चंद्राची चकोरानें, हरवलेल्या मातेची बालकानें, परमेश्वराची भक्तानें, त्याप्रमाणें येणाऱ्या टपालाकडे दत्तांची दृष्टि लागून राहिली होती. शेवटीं आगबोट आली; टपाल आलें. पैसे व पत्र, सर्व मिळालें. काळोखांत रविकिरण मिळाला; तृषार्तास सुधासिंधु लाभला, क्षुधार्तास अन्न मिळालें. मायकेल दत्तांचा, आनंद गगनांत मावेना. त्यांचें

हृदय आनंदानें भरून आलें व त्यांनीं खालील अर्थाचें सुंदर पत्र विद्यासागर यांस लिहिलें.

'गेल्या रविवारीं २८ ऑगस्ट (१८६४) रोजीं सकाळीं मी माझ्या लहान्या अभ्यासाच्या खोलींत बसलों होतों. माझी पत्नी रडवेलें तोंड करून मजकडे आली व डोळ्यांत आंसवें आणून म्हणाली, "मुलांना जत्रेस जाण्याची इच्छा आहे. परंतु मजजवळ फक्त ३ फ्रँक आहेत. तुमचे हिंदुस्थानांतील लोक इतके कठोर व निष्ठुर कसे!" मीं तिला म्हटलें, 'आज टपाल येईल, आणि ज्या माणसास मीं पत्र लिहिलें आहे, तो प्राचीन ऋषींसारखा ज्ञानाचा व धैर्याचा, सद्गुणांचा सागर आहे; इंग्लिश माणसाप्रमाणें उत्साहमूर्ति आहे. बंगाली मातेचें त्याचें हृदय आहे. तो खात्रीनें उत्तर देईल व तें आज आपणांस मिळेल.' माझें म्हणणें खरें ठरलें. एकाच तासानें तुमचें पत्र व पैसे मला मिळाले. हे थोर पुरुषा, हे यशस्विता, हे उदार मित्रा, मी शब्दांनीं कसे तुमचे आभार मानूं? तुम्हीं मला आज तारलें आहे.'

अशा प्रकारें विद्यासागर यांनीं एका शब्दानें १५०० रुपये पाठवून दिले. पुढें आणखीही जवळ जवळ तितकीच रक्कम विद्यासागर यांनीं पाठविली. एकंदर ३००० रुपये विद्यासागर यांनीं मायकेल यांस दिले.

मायकेल बॅरिस्टर होऊन इंग्लडांतून आतां परत येणार होते. त्यांस उतरण्यास चांगली जागा पाहिजे म्हणून विद्यासागर यांनीं व्यवस्था करून ठेविली होती. एक मोठा बंगला भाड्यानें घेऊन तेथें सर्व इंग्रजी थाटमाट, टेबलें, खुर्च्या सर्व कांहीं विद्यासागर यांनीं आणून ठेविलें; परंतु काय? मायकेल हे विद्यासागरांनीं ठरविलेल्या बंगल्यांत न उतरतां दुसरीकडेसच कोठें जाऊन उतरले. विद्यासागर यांनीं एवढा पैसा खर्च केला व श्रम घेतले, व्यवस्था केली, ती सर्व वायां गेली. मायकेल आतां बॅरिस्टर होऊन आले तरी त्यांच्यानें बॅरिस्टरी थोडीच चालणार होती! ते पडले वृत्तीनें कवि. इंग्रजी भाषेंत काव्य करून मिल्टन व्हावें अशी मायकेलची महत्त्वाकांक्षा. बंगालींत लिहिलेल्या कविता ते फाडून टाकीत व म्हणत 'बंगाली कोणीं लिहावें?' शेवटीं बेथून यांनीं मायकेल यांस सांगितलें 'मित्रा, परकी भाषा कितीही करतलामलवत् झाली तरी त्यांत महाकाव्य लिहिणें हें फार अशक्य आहे. या भानगडींत तूं पडूं नये. आपल्या मायभाषेंत तूं आपले विचार तूं आपलें मन खुलें करूं शकशील. बेथून यांनीं मायकेल

यांस मार्गावर आणिलें. मायकेल बंगाली भाषेमधील एक उत्कृष्ट कवि आहेत. त्यांनीं सुंदर नाटकें लिहिलीं आहेत. वाङ्मयांत त्यांचें तेज तळपूं लागलें, परंतु त्यांचे विकार बळावत चालले. वासनांचा पूर मायकेल यांस अडवतां येत नसे. ते वासनांस बळी पडत. मद्यपानाचा सुमार त्यांस राहात नसे. ऐषआरामांत, व्यसनांत सर्व पैसे संपूं लागले. वडिलांनीं पूर्वीं पैसे दिले नव्हते तरी मरावयाचे वेळीं सर्व इस्टेट पुत्रासच ठेवून दिली होती. कुबेरासारखी संपत्ति, परंतु सर्व गहाण पडली. विद्यासागरांचेंच जवळजवळ ८००० रुपये कर्ज त्यांस झालें होतें. विद्यासागरांनीं दुसऱ्याचे पैसे घेऊन मायकेलास दिलेले शेवटीं त्या सावकारांनीं जेव्हां विद्यासागरांस तगादा लाविला, तेव्हां विद्यासागर यांनीं मायकेलास आपले पैसे द्यावयास सांगितलें. परंतु तें कांहीं एक जमलें नाहीं. मायकेलांची मालमत्ता पुढें गहाण पडली. सावकारांचे तगादे येऊं लागले. सावकारांचे शब्दांचा मनावर कांहीं परिणाम होऊं नये म्हणून मायकेल सुरापानांत वाहूं लागले. दुरून सावकार पाहिला कीं मायकेल बाटली तोंडास लावीत व तर्र होऊन पडत.

अशा प्रकारें मायकेलांची स्थिति फार दुःखद झाली. कर्ज चारी बाजूंनीं फोंफावलें. सागर फुटल्यावर सिकतासेतूचें त्यापुढें काय चालणार? शेवटीं काय झालें, ते आजारी पडले व एका दवाखान्यांत जाऊन राहिले. तेथें अनाथापरी त्यांस मरण आलें. असा या थोर पुरुषाचा दुःखद अंत झाला. मायकेलांचें मन फार मोठें होतें; बुद्धि थोर होती; कल्पना लोकोत्तर होती; हृदय उदार व कोमल होतें; परंतु एका दुर्व्यसनानेंही मनुष्याचा कसा अधःपात होतो हें आपणांस त्यांच्या चरित्रावरून दिसून येतें. पंचपक्वान्नांत एक विषबिंदु पडला, दुधामध्यें एक मिठाचा खडा पडला तरी सर्वनाश होतो, तसेंच येथें झालें.

मायकेल मेल्यावर सावकार कर्जासाठीं विद्यासागर यांचेकडे येत. विद्यासागर त्यांस म्हणत, "आतां मी एक पैही मायकेलांसाठीं खर्च करणार नाहीं. मायकेल जिवंत होता त्या वेळेस जर मला त्यास मुक्त करतां आलें नांहीं, तर आतां मेलेल्या मायकेलला मुक्त करून मला काय समाधान मिळणार? तो जिवंत असतां त्याला सावकारांच्या ससेमिऱ्यामधून मला सोडवितां आलें नाहीं, आतां तो गेल्यावर अन्य कांहीं करून काय उपयोग? असें विद्यासागरांचें हृदय विशाल व कृपाळु होतें.

एकदां विद्यासागर एका खेडेगांवांत गेले होते. तेथें एका गृहस्थाच्या घरीं त्यांनीं एक मुलगा पाहिला. त्या मुलाच्या पायास एक प्रकारचा विशिष्ट रोग जडला होता. तो रोग अशा प्रकारचा होता कीं, त्यानें असें व्हावयाचें कीं, पाय आंखडत आंखडत जावयाचा. विद्यासागर त्या गृहस्थास म्हणाले, 'आपण आपल्या मुलास डॉक्टराकडे कां नेत नाहीं?' 'या गांवांत डॉक्टर आहेत कोठें? आणि दुसऱ्या मोठ्या शहरांत न्यावयाचें, तर फार लांब; तेथें ओळख ना देख; शिवाय तेथें राहावयाचें व डॉक्टरची फी वगैरे फार खर्च येईल.' असें त्या मुलाचा बाप म्हणाला. विद्यासागर म्हणाले, "समजा, दुसऱ्या कोणी तुमच्या मुलास बरें करण्यासाठीं पैसे दिले, जाण्यायेण्याचा खर्च दिला, कलकत्त्यांत सर्व सोय केली तर आपण आपला मुलगा तेथें घेऊन जाल का?" "आपण थट्टा तर करीत नाहीं? असा पुरुष या कलियुगांत दृष्टीस पडता तर काय न होतें." बाप बोलला. 'पण समजा, असा एक गृहस्थ आहे. तर तुम्ही मुलगा पाठवाल का?" "हो, न पाठवावयास काय झालें? खुशाल मुलास घेऊन येईन. परंतु सर्व प्रकरण मज गरिबाच्या गळ्यांत न येवो म्हणजे झालें.' "त्याविषयीं तुम्ही निश्चिंत असा"– असें म्हणून विद्यासागरांनीं आपल्या स्वतःच्या घरचा कलकत्त्यांतील पत्ता त्या गृहस्थास दिला व सांगितलें, "या ठिकाणीं जा म्हणजे आपलें कार्य होईल." विद्यासागर निघून गेले. हा गृहस्थ जावें कीं न जावें याविषयीं जरा साशंक होता. त्या गांवांतील एका गृहस्थास विद्यासागर यांचा कलकत्त्यांतील पत्ता माहीत होता. त्या माणसाकडे हा वरील गृहस्थ गेला व म्हणाला, 'काय हो, कलकत्त्यांत वरील पत्त्यावर कोण गृहस्थ राहातात, तुम्हांस माहीत आहे का?" त्या मनुष्यानें तो पत्ता पाहून म्हटलें, "अहो, हा पत्ता तर विद्यासागर यांच्या घराचा, खुशाल जा. तेथें तुम्हांस घरांतल्याप्रमाणें वागविण्यांत येईल.' तो गृहस्थ विद्यासागरांकडे मुलास घेऊन आला. त्या मुलाचा पाय नीट औषधोपचारांनीं बरा झाला. ईश्वरचंद्रांनीं त्याचा सर्व खर्च केला.

ईश्वरचंद्रांच्या अशा किती तरी गोष्टी सांगाव्या! परंतु आणखी दोन तीन गोष्टींचा उल्लेख करून हें परोपकारकथन पुरें करूं.

एकदां एक गरीब मुलगा रस्त्यांत विद्यासागर यांचेजवळ आला. 'महाराज, मला दोन पैसे द्या; मी उपाशी आहें." असें तो केविलवाणें तोंड करून म्हणाला. "बाळ, तुला दोन पैशांऐवजीं ४ पैसे दिले, तर तूं काय करशील?"

या प्रश्नास मुलानें उत्तर दिलें, "दोन पैसे आज खाईन, आणि दोन पैसे उद्यांसाठीं ठेवीन." "बरें तुला दोन आणे दिले तर तूं काय करशील?" आज दोन आण्यांची भाजी विकत घेईन व तिचे चार आणे करीन; एका आठवड्यांत रुपया सुद्धां करीन." मुलाचें हें उत्तर ऐकून विद्यासागर प्रसन्न झाले व त्या मुलास म्हणाले, "हें पहा, मी तुला आज दोन आणे देतों; त्याचा रुपया करून मला एक आठवड्यानें दाखव.' 'बरें' असें मुलगा म्हणाला. ते दोन आणे घेऊन मुलगा गेला व खरोखर १। रुपया मिळवून आठवे दिवशीं विद्यासागरांच्या घरीं आला. 'काय, आणलेस पैसे?' 'होय, महाराज.' विनयानें व आनंदानें मुलगा म्हणाला. मुलाची कर्तबगारी पाहून ईश्वरचंद्रांनीं त्यांस लहानसें दुकान घालून दिलें व तें चालवावयास दिलें. दुकानांत चांगली किफायत होऊं लागली. पुढें मुलगा मोठा झाला. दुकानचा व्याप वाढला. या मुलावर विद्यासागर यांचें प्रेम फार बसलें. पुढें त्या मुलाचें लग्न करून देऊन त्याचा संसार सुरळीत व सुखाचा विद्यासागर यांनीं थाटून दिला. विद्यासागर यांस जग कुटुंबाप्रमाणें होतें, नव्हे का? विद्यासागर यांच्या मेट्रापॉलिटन संस्थेंत किती तरी विद्यार्थी नादार असावयाचे. मी गरीब आहें असें सांगितलें म्हणजे मिळालीच नादारी. विद्यासागर यांस एखाद्या मुलास आईबाप नाहींत असें कळलें कीं त्या मुलाची सर्व सोय ते लावीत. 'महाराज, माझी आई नाहीं.' एवढें म्हटलें म्हणजे पुरें, कीं विद्यासागर रडावयास लागावयाचें आणि त्या मुलास नादारी मिळावयाची. 'आई नाहीं' एवढें प्रशंसापत्र असलें म्हणजे पुरें. असे पुष्कळ विद्यार्थी विद्यासागरांच्या या उदारतेमुळें पुढें कर्ते झाले व आज कलकत्त्यांत प्रतिष्ठित व श्रीमंत म्हणून मिरवत आहेत.

एकदां विद्यासागर आईनें अगत्यानें बोलावल्यामुळें दामोदर नदी पोहून कसे रातोरात घरीं आले, तें मागं सांगितलेंच आहे. त्या रात्रीं विद्यासागर यांस जेवावयास बारा वाजले. दमून भागून आलेला मुलगा. आईनें ताजा स्वयंपाक केला व मुलास वाढलें. त्या वेळेस मध्यरात्रीचा समय झाला होता. विद्यासागरांचें जेवण चाललें असतां शेजारच्या घरांत नवराबायको बोलत होतीं. 'उद्यां आतां मुलास खावयास काय द्यावयाचें बरें? आज थोडें पीठ होतें तें संपलें. आपण तर अन्नाशिवाय राहिलांत, कसें करावें?' असें बायको नवऱ्यास बोलत होती. हा संवाद, ही कहाणी विद्यासागर व त्यांची आई

यांच्या कानावर पडली. मग काय, विद्यासागर यांस तें अन्न कसें गोड लागेल ? विद्यासागरांच्या आईनें त्या नवराबायकोंस बोलावून त्यांस पोटभर जेऊं खाऊं घातलें. परंतु विद्यासागरांचें समाधान एवढ्यानेंच झालें नाहीं. दुसऱ्या दिवशीं विद्यासागरांनीं या कुटुंबास कायमचें मासिक पेन्शन ठरवून टाकिलें. विद्यासागर राजे व लोक प्रजा !

अन्नदान व वस्त्रदान यासमान दुसरें पवित्र दान नाहीं. दरवर्षी दुर्गा-पूजेचा सण आला कीं विद्यासागर आपल्या आईकडे खेड्यांतील गरीब-गुरिबांस देण्यासाठीं कपडे पाठवावयाचे. त्यांची आई अशीच परम उदार. एकदां विद्यासागर यांनीं पाठविलेले सर्व कपडे खलास झाले. तेव्हां आईनें आणखी कपडे पाठवून देण्याबद्दल विद्यासागर यांस लिहिलें. विद्यासागर यांस फार आनंद झाला आणि त्यांनीं दुप्पट कपडा पाठवून दिला. दुर्गापूजेच्या दिवशीं विद्यासागरांच्या आईकडे सर्वांस अन्नदान व वस्त्रदान व्हावयाचेंच.

विद्यासागर मनुष्यप्राण्यावरच प्रेम करीत एवढेंचे नव्हे. त्यांच्या प्रेमसिंधूंत सर्व प्राणिमात्र होते. एकदां त्यांच्याकडे त्यांचे एक मित्र आले होते. त्यांच्या-पुढें विद्यासागरांनीं संत्रीं ठेविलीं. हा गृहस्थ काय करी, अर्धवट संत्रें खाई व उरलेल्या फोडी टाकून देई. विद्यासागर म्हणाले, 'असें निष्कारण टाकून देऊं नकोस.' 'आहे कोण तुमच्याकडे दुसरें खावयास ?' असें त्या मित्रानें विचारिलें. विद्यासागर म्हणाले; 'त्या खिडकीच्या बाहेरच्या बाजूस ठेवून देत जा, म्हणजे माझीं माणसें येऊन घेऊन जातील.' तो गृहस्थ तसें करूं लागला. परंतु त्यास कोणी माणूस तर खिडकीजवळ दिसेना. 'कोठें आहेत हो तुमचीं माणसें ? मला तर कोणी दिसत नाहीं. गप्पा मारतां.' असें स्नेही म्हणाले. 'असे माझ्या जागेवर तुम्ही बसा व मी तुमच्या जागेवर बसतों; म्हणजे तुम्हांस दिसतील माझीं माणसें,' असें विद्यासागर हंसून म्हणाले. आपल्या जागांची त्यांनीं आलटापालट केली तों खिडकींत पांखरें येऊन तीं फळें खात आहेत असें स्नेह्यास दिसलें. या पांखरांस विद्यासागर फळें, धान्य देत; तीं विद्यासागरांस मुळींच भीत नसत. विद्यासागरांची ही स्थितप्रज्ञ व प्रेमवृत्ति पाहून 'धन्यानां गिरिकंदरेषु वसतां ज्योतिः परं ध्यायताम्। आनंदाश्रु-कणान् पिबन्ति शकुना निःशंकमंकेशयाः' या भर्तृहरीच्या योग्यांच्या वर्णनाची आठवण होते. द्विजेंद्रनाथ टागोर (रवींद्रनाथांचे वडील बंधु) यांची अशीच वृत्ति होती असें सांगतात.

विद्यासागरांच्या अशा या निस्सीम उदारपणाचा फायदा पुष्कळ लबाड लोकही घेत. याबद्दलची एक गंमतीची गोष्ट सांगतों. एकदां एका मुलानें विद्यासागरांस पत्र पाठविलें, 'मी तिसऱ्या यत्तेंत आहे; मजजवळ खालील पुस्तकें नाहींत; तरी आपण कृपा करून पाठवाल तर गरिबावर फार उपकार होतील.' विद्येसाठीं गरीब मुलास मदत करावयाची नाहीं तर कोणास करावयाची? विद्यासागर यांनीं या मुलास तीं पुस्तकें पाठवून दिलीं. एक वर्षानें त्या मुलानें चवथ्या यत्तेचीं पुस्तकें मागितलीं; असा त्याचा क्रम सातवीपर्यंत चालला. एकदां काय झालें, ज्या गांवीं हा मुलगा पुस्तकें मागवून घेई, त्या गांवांतील शाळेचे मुख्य गुरुजी विद्यासागरांस भेटले. विद्यासागरांनीं त्या यत्तेंतील विद्यार्थ्यांची चौकशी केली. 'या नांवाचा मुलगा मला माहीत नाहीं,' असें गुरुजी म्हणाले. 'वाः, शाळेचे मुख्य गुरुजी तुम्ही, आणि चार वर्षें सतत उत्तीर्ण होणारा मुलगा तुम्हांस माहीत नाहीं? झालांत कशाला मुख्य गुरुजी?' असें विद्यासागर जरा रागानें त्या गुरुजींस म्हणाले. 'मी गेल्यावर चौकशी करून काय तें कळवीन' असें त्या शिक्षकांनीं कबूल केलें. ते शिक्षक आपल्या गांवीं परत आले. त्यांनीं सर्व वर्गांत फिरून चौकशी केली, परंतु त्या नांवाचा मुलगा त्यांस आढळेना. शेवटीं चौकशी करतां असें आढळलें कीं, त्याच नांवाचा मुलगा शाळेजवळच एक दुकान घालून राहतो. त्या मुलाचें पुस्तकें विकण्याचें दुकान होतें आणि तो दरवर्षी विद्यासागरांकडून अशीं मोफत पुस्तकें मिळवी. तेवढाच जास्त फायदा. विद्यासागरांस ही गोष्ट कळविण्यांत आली व त्यांस जगाचें आश्चर्य वाटलें. इतका अप्रामाणिकपणा लोकांत कां असावा याचें त्यांस कोडें पडे. बहुतकरून जेवढ्या लोकांस ईश्वरचंद्रांनीं साहाय्य केलें, त्यांनीं त्या साहाय्यासाठीं कृतज्ञता तर नाहींच दर्शविली; पैसे वगैरे परत नाहींच केले; तर उलट त्यांचें नुकसान करावयास, त्यांची निंदा करावयास मात्र ते तयार असत. एकदां एका मित्रानें विद्यासागरांस सांगितलें कीं, अमका अमका फलाणा माणूस तुमची निंदा करितो. लगेच विद्यासागर विनोदानें व यथार्थतेनें म्हणाले, 'कां बरें? त्यानें माझ्याविषयीं मनांत वांकडें कां धरावें? मीं त्याचें चांगलें तर कांहींच केलें नाहीं! त्याच्या उपयोगी मी अद्याप पडलों नाहीं; मग माझेविषयीं तो दुष्टावा करितो याचें कारण काय?' ज्याचें आपण चांगलें करावें, तो हटकून आपलें वाईट करणार असा खरोखर विद्यासागरांस पूर्ण अनुभव आला होता.

दुसऱ्यावर निरपेक्ष उपकार करणारे विद्यासागर पूर्णपणें निरहंकारी होते. अहंकार त्यांच्या ठिकाणीं नसे. याच्याही पुष्कळ कथा आहेत. एकदां एका स्टेशनावर एक श्रीमंत तरुण मुलगा गाडींतून उतरला. तो मोठा ऐटबाज होता. खिशांत घड्याळ, डोळ्यांस चष्मा असा थाट होता. त्यास स्टेशनवरून घरीं सामान नेण्यास हमाल मिळेना. कर्मधर्मसंयोगानें विद्यासागर हे स्टेशन-वर आले होते. विद्यासागर यांचा वर्ण काळा; अंगानें चांगले धष्टपुष्ट, मजबूत, आणि कपडे अगदीं जाडेभरडे. या श्रीमंतानें विद्यासागरांस विचारलें, 'काय रे ए हमाल, ही ट्रंक घेऊन चलतो का?' 'होय साव' विद्यासागर म्हणाले. विद्यासागर यांनीं ती ट्रंक आपल्या डोक्यावर घेतली. पुढें तो मुलगा व पाठी-मागून विद्यासागर चालले होते. रात्रीची वेळ होती म्हणून बरें. शेवटीं त्या मुलाचें घर आलें. विद्यासागर यांनीं ट्रंक खालीं उतरली. तो श्रीमंत मुलगा त्यांस ४ आणे देऊं लागला. हमाल पैसे घेईना. 'आठ आणे घे' तरी हमाल हात पसरीना. शेवटीं विद्यासागरांनीं सांगितलें, 'मला पैसे वगैरे नकोत. परंतु आपण स्वतःचें काम करण्यास कधीं लाजूं नका, एवढेंच लक्षांत ठेवा.' इतक्यांत त्या मुलाचा बाप आला. त्यानें विद्यासागरांस ओळखिलें व तो मुलास रागें भरला. विद्यासागर म्हणाले, 'त्यास रागें भरण्याची जरुरी नाहीं. त्याला मी काय माहीत? अतःपर कोणी हमाल वगैरे नसला म्हणजे त्यानें लाज धरूं नये म्हणजे झालें.'

घरांतील बाजाराचें वगैरे सर्व सामान विद्यासागर खांद्यावर झोळी टाकून घेऊन यावयाचे. एकदां विद्यासागर बाजारांतून रताळीं वगैरे पुष्कळ सामान भरून घेतलेली झोळी खांद्यावर टाकून येत होते. समोरून येणाऱ्या एका श्रीमंत गृहस्थानें पाहिलें कीं, विद्यासागर सामान हमालप्रमाणें वाहून नेत आहेत. श्रीमंत मनुष्य व विद्यासागर हे मोठे मित्र. विद्यासागर वाटेंत भेटले तर या हमालसदृश गृहस्थांस मला नमस्कार चमत्कार करावे लागणार तर ती आपणांस भररस्त्यांत लाजच. म्हणून विद्यासागरास टाळावें असा या लक्ष्मीपुत्रांनीं विचार केला आणि शिरले एका बोळांत व पलीकडच्या रस्त्या-वर आले. विद्यासागर यांचें या गोष्टीकडे लक्ष होतें. त्यांनीं पण गल्ली ओलांडून पुनः त्याच श्रीमंताचा रस्ता सुधारला व दोघांची शेवटीं गांठ पडली. नमस्कार झाल्यावर विद्यासागर म्हणाले, 'आपण कां आलांत या रस्त्यानें हें मीं सांगूं का?' तो गृहस्थ ओशाळला व त्यानें सर्व कबूल केलें.

एकदां विद्यासागर एका दुकानदाराच्या ओट्यावर बसून गप्पा मारीत होते. एक श्रीमंत मनुष्य मोटारींत बसून येत होता. या भिकारड्या दुकानदाराशीं विद्यासागर गप्पा मारीत असलेले त्यांनीं पाहिलें. ईश्वरचंद्र व ते श्रीमंत गृहस्थ स्नेही होते. विद्यासागरांस मी नमस्कार नाहीं केला, तरी ते करणारच. आणि आपला दोघांचा समसंबंध या भिकारड्यास कळणारच; तर मग आपणच मोटार थांबवून विद्यासागरांशीं बोलून मनाचा मोठेपणा दाखवावा, असें त्या गृहस्थानें मनांत आणून, त्याप्रमाणें केलें. परंतु ईश्वरचंद्रांस ते हळूच काय म्हणतात, 'हें पाहा विद्यासागर, असें आपण हलक्या लोकांशीं बोलत बसणें योग्य नव्हे. ज्यानें त्यानें आपला बोज संभाळून वागलें पाहिजे, नाहीं तर हास्यास्पद होतें.' विद्यासागर जरा हंसले. ते अर्थातच कांहीं बोलले नाहींत.

विद्यासागर यांस जरी महाविद्यालयांत मुख्य पंडिताची जागा मिळाली होती, तरी ते पुष्कळ दिवस घरीं हातानें स्वयंपाक करीत. लोकांत ते विद्वान् म्हणून गाजले, परंतु हातची चूल मात्र त्यांची सुटली नाहीं. त्यांस एकट्याचाच स्वयंपाक करावयाचा नसे. तर धाकटे भाऊ वगैरे कलकत्त्यासच शिकण्यासाठीं राहत, त्या सर्वांचा स्वयंपाक त्यांसच करावा लागे. विद्यासागर १०।१२ वर्षांचे असल्यापासून स्वतः स्वयंपाक करीत. त्यांचे वडील ठाकुरदास हे कांहीं करावयाचे नाहींत. या लहान मुलासच तिघांचौघांचा स्वयंपाक करणें भाग पडे. स्वयंपाक करावयाचा, सर्व अभ्यास करावयाचा, पुन्हां विद्यालयांत पहिला नंबर मिळवून शिष्यवृत्ति वगैरे कायम ठेवावयाची. विद्यासागरांचे बाप एरवीं दयाळू असले, तरी ते मुलाच्या बाबतींत फार कठोर असत. ईश्वरचंद्रांचा अभ्यास झाला आहे कीं नाहीं हें ते स्वतः पाहावयाचे. जरी त्यांस संस्कृताची विशेष माहिती नसे, तरी त्यांस वाचतां येत असे. आणि त्यामुळें विद्यासागरांस जो धडा असे, तो धडा ते तोंडपाठ करून घ्यावयाचे. विद्यासागर जर एक अक्षरही चुकले, तर त्याची कंबक्तीच भरावयाची. मुलास घरीं फार काम असतें याचा विचार ठाकुरदास करावयाचे नाहींत. कधीं कधीं ते विद्यासागर यास इतकें मारीत कीं, त्याच्या घराची मालकीण ठाकुरदासांस सांगे, 'अहो, तुम्ही ही जागा सोडून कां जात नाहीं ? ढोराप्रमाणें त्या लहान मुलास तुम्ही मारतां; असे कसाब कसे तुम्ही !' ही बाई जरा सदय अंतःकरणाची होती. विद्यासागरांस ठाकुरदास मारून रक्तबंबाळ करायचे. आजूबाजूचे

लोक मग या गरीब मुलाची या दुष्ट बापाच्या हातून सुटका करीत. एक दिवस तर विद्यासागर घरांतून पळून गेले; परंतु सायंकाळ झाल्यावर पुन्हां घरीं आले. जाणार कोठें ? किती मारलें सवरलें, तरी ते बापाकडेच येणार. त्या दिवशीं अर्थात् पळून जाण्याबद्दल विद्यासागरांस वडील रागावले नाहींत.

जेथें विद्यासागरांस स्वयंपाक करावयाचा असे, तें स्वयंपाकघर अत्यंत गलिच्छ असे. त्या काळीं कलकत्त्यांत मोऱ्या वगैरे नीट सुधारलेल्या नव्हत्या. संडास, घाणेरडें पाणी, मोऱ्या गलिच्छ असा कारभार. या विद्यासागरांच्या स्वयंपाकघरांत किडे यावयाचे. जिवंतपणींचा नरकच तेथें होता. रात्रीच्या वेळीं काय होई, विद्यासागरांचे भाऊ, वडील वगैरे बाहेरच्या खोलींत जेवावयास बसत. अर्थात् वाढणारे विद्यासागरच असावयाचे. जेवणें झाल्याबरोबर बाहेरची मंडळी तेथेंच उष्टी काढून लगेच आपल्या पथारी पसरून देत व झोंपी जात. विद्यासागर कोठें जेवावयास बसतील यांची त्यास फिकीर नसे. त्या किड्यांच्या राज्यांत विद्यासागर जेवावयास बसत. दोन तीन पाण्याचे तांब्ये भरून ते घेत. किडा जवळ आला कीं त्याच्या अंगावर जोरानें पाणी उडवून त्यास ते दूर करीत. अशा तऱ्हेनें आजूबाजूस सर्व पाणी व्हावयाचें. या ओलट जमिनीवर त्यांचा व्यवहार चालावयाचा. परंतु विद्यासागर यांची प्रकृति जात्याच धूड व बळकट म्हणून या सर्व दिव्यांतून ते सहीसलामत बाहेर पडले. नाहीं तर क्षय, मलेरिया, सांधे धरणें वगैरे नाना रोग त्यांस जडले असते.

अशा प्रकारची खडतर तपश्चर्या बालपणीं करावी लागल्यामुळें विद्यासागर हे निरहंकारी राहिले, साधे राहिले यांत विशेष आश्चर्य नसेल असें तुम्ही मानूं नका. जे असे लहाणपणीं कष्ट सोसतात, त्यांस वैभव मिळालें म्हणजे लहानपणच्या दुःखाचा केव्हां सूड घेऊं असें होतें. व मग ते इतका भोग-विलास वगैरे करितात कीं, जसे काय स्वर्गांतील राजे. विद्यासागरांचें तसें कांहीं नाहीं. पंडित झाले तरी बल्लवाचें काम ते आनंदानें करताहेत; महा-विद्यालयाचे प्रिन्सिपाल, ५०० रुपये पगार झाला, तरी बाजार स्वतः करून खांद्यावर सामानाची जड झोळी घेऊन येत आहेतच. शेवटपर्यंत ते असे निरहंकारी राहिले. चैन हा शब्द त्यांस माहीत नसे. त्यांस एक चैन करावीशी वाटे, ती म्हणजे पुस्तकांच्या बाबतींत. सुंदर सोनेरी पुठ्याचीं सुरेख बांधणीचीं पुस्तकें त्यांना आवडावयाचीं. नवीन पुस्तक दिसलें कीं तें

ते घ्यावयाचे. एवढी एक चैन त्यांस असे. परंतु त्यांस दुसरी कसली हौस नसे. त्यांचे कपडे अगदीं साधे, जाडेभरडे असत. ते दुसऱ्यास सुंदर गिरणीचें कापड घेऊन देत, परंतु स्वतः हातमागावरील जाडें कापड वापरीत. विद्यासागर लहानपणीं संस्कृत महाविद्यालयांत शिकत असतां त्यांस जी शिष्यवृत्ति मिळे, त्यांतून ते आपल्या गरीब सहाध्यायांस सुंदर कपडे करून देत; परंतु त्यांचा स्वतःचा कपडा अगदीं साधा जाडाभरडा असे. मुलानें या बाबतींत, दुसऱ्या मुलांस देण्याच्या बाबतींत किती पैसा खर्च केला तरी त्याचे वडील ठाकुरदास त्यास बोलत नसत. उलट मुलामधील ही उपजत दानबुद्धि, परोपकारबुद्धि कशी वृद्धिंगत होईल हेंच ठाकुरदास पाहत. अभ्यासांत जरा चुकलें तर पाठीचें धिरडें करणारे ठाकुरदास अशा समयीं मुलाची पाठ थोपटीत व "चांगलें केलें बेटा, असेंच करावें बरें." असें उत्तेजन देत. मोठ्या मोठ्या अधिकाऱ्यांजवळ विद्यासागर यांची दोस्ती. परंतु राजाची भेट घेणें असो वा रंकाच्या चंद्रमौळी झोंपडींत जावयाचें असो, विद्यासागरांच्या वेषरचनेंत कांहीं फरक म्हणून कधीं होत नसे. मोठमोठ्या अधिकाऱ्याच्या, लेफ्टनंट गव्हर्नराच्या मोटारींतही ते त्यांच्या बरोबर बसून जात. परंतु विद्यासागर यांस आपल्या साध्या पोषाखानें जाण्यास कधीं लाज वाटली नाहीं.

विद्यासागर हे विनयाची मूर्ति होते. गर्वाची बाधा, वृथाभिमान हीं त्यांस शिवलीं नाहींत. डामडौल त्यांस माहीतच नव्हता. नम्रता हा त्यांचा अभिजात गुण. एकदां एक पूर्वबंगालमधील गृहस्थ पश्चिम बंगालमधील मोठे लोक कसे असतात हें पाहण्यास निघाला. त्यांस या मोठ्या लोकांची परीक्षा घ्यावयाची होती. तो प्रथम एका मोठ्या गृहस्थाकडे गेला. आपण ऐकलें त्याप्रमाणें हा पुरुष खरोखर मोठा आहे का हें त्यांस पाहावयाचें होतें. झालें; तें ह्या घरांत गेले. परंतु काय! तेथें त्यांची दादच लागेना. "आतां वेळ नाहीं. पुन्हां केव्हां तरी या, सध्यां फार काम आहे," असा वरून त्या मोठ्या पुरुषाचा निरोप आला. तो गृहस्थ आल्या पावलीं माघारा गेला. नंतर दुसऱ्या एका अशाच थोर समजले जाणाऱ्या गृहस्थाच्या घरीं हा मनुष्य गेला; तेथें पहिल्यासारखीच किंबहुना जास्तच कटुतर अशी त्याची संभावना झाली. तेथें अर्धचंद्र मिळाला व हे गृहस्थ निमूटपणें माघारे परतले. हा पूर्वबंगाली गृहस्थ आतां संतापला. तो म्हणाला, 'दोन श्यालक ( या शब्दाचा अपभ्रंश त्याने वापरला ) पाहिले; आतां तिसरा पाहावयाचा राहिला आहे.

हा गृहस्थ आतां विद्यासागरांकडे आला. ' विद्यासागर घरांत आहेत का? आम्ही त्यांस भेटावयाच्या हेतूनें आलों आहोंत. आहेत का? भेटतील का? सांगा लवकर, नाहीं तर आपला चालता होतों." विद्यासागर तेथेंच ओटीवर होते. ते म्हणाले, "या, बसा. पाय वगैरे तर धुवा. कपडे वगैरे काढा. तोंड वगैरे धुऊन जरा अल्पाहार करा; दूध वगैरे घ्या तों विद्यासागर येतीलच." "छेः छेः मला बसावयास वेळ नाहीं. आधीं ते असले तर पुढचा प्रश्न. वरती कोठें असतील नाहीं का? त्यांस खालीं भेटावयास वेळ नसेल नाहीं? फार असतील बडीं बडीं कामें त्यांना?" असें हा परका गृहस्थ आवेशानें म्हणाला. "असें काय करतां? आल्यासारखे आतां येथेंच राहा. आंघोळ वगैरे सर्व घ्या करून. मी तुमची सर्व व्यवस्था करितों. येथें तुमचें काडीइतकें न्यून पडणार नाहीं. आपलेंच घर समजा. विद्यासागर मग भेटतीलच तुम्हांस. विद्यासागर म्हणजे का कोणी राजे आहेत, का देव आहेत, तुम्हांस न भेटण्यास?" विद्यासागरांचे हे शब्द ऐकून तो मनुष्य जरा शांत झाला. येथें कांहीं तरी निराळा आतिथ्य-प्रकार दिसतो आहे असें त्यानें पाहिलें. शेवटीं त्यांनीं पोशाक काढला. स्नान वगैरे झालें. आंत भोजनाची तयारी झाली. पानें मांडलीं. पाहुण्यांस पहिल्या पानावर नेऊन विद्यासागरांनीं बसविलें. जेवणाचा थाट चांगलाच होता. आलेले सद्गृहस्थ म्हणाले, "विद्यासागर नाहीं वाटतें आमच्या पंक्तीबरोबर जेवावयाचे? त्यांची मागाहून खाशांची पंगत व्हावयाची असेल?" विद्यासागर म्हणाले, "तसें नाहीं परंतु आपण फार दुरून आलांत; आपण भुकेले असाल; दमले असाल. तेव्हां आपण भोजन वगैरे करून विश्रांति घेतलीत म्हणजे आपणांस आराम वाटेल. या हेतूनें आपल्यासाठीं लवकर जेवणाचा बेत केला आहे. निराळी पंगत वगैरे असले प्रकार येथें नाहींत." भोजन झालें. विडेतांबूल झाले तरी विद्यासागर ही व्यक्ति त्या गृहस्थास पाहावयास मिळेना. विद्यासागर त्यांस म्हणाले, 'आतां आपण जरा वामकुक्षी करा. जरा आरामशीर पडा. तों विद्यासागर येतीलच.' शेवटीं तो गृहस्थ जरासा लवंडलाच. दमल्यामुळें त्यास झोंप पण लागली. वामकुक्षी झाली. निद्रा झाल्यावर पाण्यानें मुखप्रक्षालन व नेत्रप्रक्षालन झालें. आतां मात्र हा गृहस्थ संतापला. तो म्हणाला, 'मी येथें विद्यासागरांस पाहावें म्हणून आलों, ती गोष्ट बाजूसच राहिली; आणि हें खाणें पिणें झोंपणें कशासाठीं? मी कांहीं अन्नार्थी पोटार्थी येथें आलों नाहीं; अन्ना

साठीं मी सुजलों नाहीं.' गोष्ट निकरावरच आली तेव्हां विद्यासागर म्हणाले, 'अहो, मला तर तुम्ही सकाळपासून पहात आहांत. मीच हो तो विद्यासागर. असे रागावूं नका. मनांत म्हटलें तुम्हांस जरा विश्रांति वगैरे मिळाली म्हणजे मग सांगूं एकमेकांस.' विद्यासागरांचे हे शब्द ऐकून तो गृहस्थ ओशाळला. जो पुरुष आपली एवढी बरदास्त स्वतः अंगें ठेवीत होता, तो पुरुष म्हणजेच विद्यासागर! खरें असेल का? अशी क्षणभर शंका त्या गृहस्थास आली. परंतु क्षणभरच. नंतर त्या गृहस्थानें आपला पूर्व अनुभव विद्यासागरांस सांगितला व म्हणाला 'मला आज एक थोर पुरुष सांपडला. आपण मात्र खरोखर थोर म्हणवून घेण्यास पात्र आहांत. आपली महति खरी व यथार्थ आहे. मोठेपणा खऱ्या विनयानें शोभतो.' विद्यासागरांस आत्मश्लाघा आवडत नसे. ते केवळ गप्प बसले होते. ते गृहस्थ दोन दिवस पाहुणचार घेऊन आपल्या घरीं निघून गेले.

कोणीही परका गृहस्थ भेटला तर त्यास आधीं 'आपलें जेवण झालें का' असें विद्यासागर विचारावयाचे. स्वर्माटाड·येथील बंगल्यावर विद्यासागर राहत असतां एक गृहस्थ कांहीं कामासाठीं त्यांच्याकडे आला. त्यास विद्यासागरांनीं विचारिलें 'आपलें जेवण झालें आहे का?' हा प्रश्न ऐकून तो गृहस्थ रडूं लागला. त्याचे डोळे पाण्यानें भरून आले. 'अहो रडतां कां? काय पाहिजे तें सांगा' असें आश्वासनपर विद्यासागर त्यास म्हणाले. 'आजपर्यंत मी अनेक ठिकाणीं गेलों; मी मुशाफिर आहें. परंतु असला प्रश्न तुम्हीच केलात म्हणून आपलें मन पाहून मी आनंदित झालों. तुमच्यावर या संताळ्यांचें प्रेम कां आहे तें मला आतां उमजलें—म्हणून माझे डोळे आनंदाश्रु ढाळीत आहेत. मी आपणांकडे अन्य कामासाठीं आलों आहें. देवकृपेनें जेवणाची वगैरे मला ददात नाहीं,' असें त्या गृहस्थानें त्यांस सांगितलें.

विद्यासागर जरी इतके साधे व विनम्र होते तरी ते स्वाभिमानी पण होते. अपमान त्यांस सहन होत नसे. जेथें आपली मानखंडना होते तेथें ते क्षणभरही राहावयाचे नाहींत. स्वाभिमान राखतां येईना म्हणून त्यांनीं बड्या पगाराच्या नोकरीवर कशी लाथ मारली, घरीं पंचाईत होती तरी तिळभर विचार कसा केला नाहीं, हें मागें सांगितलेंच आहे. घरीं दारिद्र्य, समोर मोठ्या पगाराची नोकरी अशा वेळीं असा स्वाभिमान किती लोक दाखवूं शकतील!

जे स्वतःस मोठे प्रतिष्ठित समजून दुसऱ्यांस तुच्छतेनें लेखतात, त्यांस धडा

घालून द्यावयाचा हें विद्यासागरांचें ब्रीद होतें. एकदां हिंदु कॉलेजचे प्रिन्सिपाल कारसाहेब यांस विद्यासागर भेटावयास गेले होते. परंतु कारसाहेबांनीं 'या बसा' वगैरे एक शब्दही उच्चारिला नाहीं. विद्यासागरांकडे त्यांनीं ढुंकूनही पाहिलें नाहीं. विद्यासागर मनांत सर्व उमजले. ही गोऱ्या गृहस्थाची गुर्मी आहे; हे मदोद्धत आहेत. आपण पडलों काळे एतद्देशीय. बरें आहे. पाहून घेऊं. वगैरे मनांत विचार करीत विद्यासागर घरीं निघून गेले.

पुढें एक दिवस असें झालें कीं, कारसाहेबांस विद्यासागरांकडे कांहीं कामानिमित्त यावें लागलें. विद्यासागरांजवळ सर्व शिक्षणाधिकाऱ्यांस काम पडे. विद्यासागरांनीं दुरून पाहिलें कीं, कारसाहेब येत आहेत. लगेच त्यांनीं नोकरांस सांगितलें, 'वरच्या दिवाणखान्यांतील सर्व खुर्च्या वगैरे दुसरीकडे नेऊन ठेवा. टेबलसुद्धां तेथें नको. खालीं एक जाजम व लोड मात्र असूं द्या.' नोकरानें सांगितल्याप्रमाणें सर्व केल. विद्यासागर त्या लोडाशीं जाऊन बसले व वाचण्यांत गर्क झाले. कारसाहेब आले. नोकर त्यांस वर घेऊन आला. विद्यासागरांनीं वर ढुंकूनही पाहिलें नाहीं. आदरातिथ्य वगैरे सर्व बाबतींत नकार. साहेब सर्व मनीं समजले. विजेप्रमाणें सर्व प्रकार चटकन् त्यांच्या ध्यानांत आला. परंतु एका नेटिव्हानें एका गोऱ्याचा असा अपमान करावा हें त्यांस सहन झालें नाहीं. कारसाहेब यांनीं ही गोष्ट डायरेक्टर यांस कळविली. डायरेक्टर यांनीं लेफ्टनंट गव्हर्नरांस ही हकिगत कळविली. लेफ्टनंट गव्हर्नरांस डायरेक्टर म्हणाले, 'काय हो, आपण तर विद्यासागरांस विद्वान्, विनयशील, थोर समजतां. परंतु आज तर कारसाहेबांच्या दृष्टोत्पत्तीस असें आलें कीं, ते हलक्या वृत्तीचे मनुष्य आहेत. त्यांस सभ्याचाराचा गंध सुद्धां नाहीं. ले. गव्हर्नरसाहेब म्हणाले, 'कांहीं तरी घोंटाळा झाला असेल. विद्यासागर असें कधीं करावयाचे नाहींत, अशी माझी पक्की खात्री आहे.' 'अहो, पण प्रत्यक्ष अनुभव घेऊन कारसाहेबांनीं मला ही गोष्ट सांगितली.' 'बरें, ठीक आहे, मी विद्यासागरांस उद्यां बोलावून घेतों व त्यांस सर्व हकीगत विचारतों म्हणजे गैरसमज असेल तर दूर होईल,' असें गव्हर्नर म्हणाले. दुसऱ्या दिवशीं गव्हर्नरांच्या आमंत्रणावरून विद्यासागर त्यांचेकडे आले. सर्व नमस्कारचमत्कार झाल्यावर गव्हर्नरांनीं त्यांच्या विलक्षण वर्तणुकीबद्दल विद्यासागरांस प्रश्न केला. विद्यासागर म्हणाले, 'अशा प्रकारें स्वागत करावयाची तऱ्हा मी यांच्यापासूनच

शिकलों. मी यांच्याकडे गेलों असतां मला त्यांनीं असेंच वागविलें. तेव्हां मला वाटलें कीं, युरोपीयन लोकांत आपल्याकडे आलेल्या गृहस्थांचें अशा प्रकारचें स्वागत करितात. अर्थात् कार माझ्याकडे आल्यावर युरोपीयांच्या चालीप्रमाणें, कारसाहेबांस जसें आवडतें तसें स्वागत मीं त्यांस दिलें. माझी गैरसमजूत झाली असेल तर क्षमा करा. परंतु माझा अपराध मला दिसत नाहीं.' गव्हर्नर यांनीं ही हकीगत डायरेक्टर यांस कळविली. डायरेक्टर कारसाहेबांकडे जाऊन म्हणाले, 'तुम्हीच संस्कृत कॉलेजच्या प्रिन्सिपालकडे (विद्यासागरांकडे) जा व प्रकरण मिटवा.' हें सर्व ऐकून कार जरी गोरे होते तरी काळवंडले. त्यांचें तोंड उतरलें. रुबाब कमी झाला. त्यांनीं आपली चूक विद्यासागरांकडे जाऊन कबूल केली. शेवटीं परस्पर मनें साफ होऊन कांहीं एक मनांत किंतु न राहतां विद्यासागर व कारसाहेब हे मित्र झाले.

एकदां विद्यासागरांकडे एक परप्रांतीय महाराष्ट्रीय आला होता. तो मुंबईचा होता. कलकत्ता शहर फार प्रेक्षणीय व सुंदर आहे. तेथें जो म्यूझीयम आहे तो तर फारच भव्य व विस्तृत आहे. खुद्द हिंदुस्थानसरकारच्या देखरेखींत हा म्यूझीयम, हें पदार्थसंग्रहालय असे. विद्यासागर हे त्या नवख्या गृहस्थांस बरोबर घेऊन म्यूझियम दाखविण्यास गेले. विद्यासागरांच्या पायांत जोडा होता. आतां त्या म्यूझीयममध्यें असा नियम होता कीं, जोडे वाहाणा सर्व बाहेर काढून मग आंत जावयाचें. विद्यासागरांच्या हें लक्षांत नव्हतें. ते आंत जाऊं लागले, तों द्वाररक्षकानें त्यांस हटकलें व जोडे काढण्यास सांगितलें. जोडे काढून आंत जाण्यापेक्षां बाहेरच राहणें बरें असा मनांत विचार करून विद्यासागर त्या गृहस्थांस म्हणाले, 'जा' आपण पाहून या; मी येथें बसून राहातों.' शेवटीं ही बातमी म्यूझीयमचे जे मुख्य व्यवस्थापक होते, त्यांच्या कानांवर गेली. ते लगेच खालीं आले. विद्यासागरांस अदबीनें नमस्कार करून व्यवस्थापक म्हणाले, 'आपण कोण आहांत हें नोकरांस माहित नाहीं, म्हणून हा अक्षम्य अपराध घडला. तरी त्याचा राग न मानतां आपण आतां जोडे वगैरे न काढतां आंत चला. आपण कांहीं एक मनांत किंतु आणूं नये.' विद्यासागर म्हणाले, 'माझ्यासाठीं म्हणून ही विशिष्ट कृपा मला नको. जर सर्व-साधारण लोकांस जोडे घालून जातां येत नसेल, तर मी पण जाणार नाहीं. माझ्या मोठेपणामुळें मला ही परवानगी मिळावयास नको आहे. नैसर्गिक

स्वातंत्र्यानें जातां येत असेल तर मी जातों. माझे इतर गरीब देशबांधव, त्यांतीलच मी. त्यांना जसा अपमान येथें सोसावा लागत असेल, तसा मलाही सोसूं द्या. लाखों जणांचा अपमान होत असतां, मी प्रतिष्ठितपणानें मिरवावें असें मला बिलकूल वाटत नाहीं. उलट त्या योगें मला बरें वाटेल.' व्यवस्थापकांनीं पुष्कळ विनविलें, परंतु विद्यासागर आंत गेले नाहींत. युरोपीयनांच्या पायांत बूट असला तरी चालतो. तोच युरोपीय बूट एतद्देशीय घालून गेला, तरी त्यास मज्जाव होत नाहीं. पातक जें केलेलें आहे, तें फक्त देशी जोड्यांनीं, देशी वाहणांनीं. युरोपीय बूट हा जेत्यांचा बूट आहे. तो विजयी लोकांच्या पदस्पर्शानें पुनीत झालेला आहे. तो युरोपांत जन्मला आहे. युरोपांत जें जन्मतें, जें पिकतें, युरोपांत जो आचार आहे, जो विचार आहे, तो अपवित्र कसा असूं शकेल ? त्याची विटंबना, मानहानी, अप्रतिष्ठा कोण करणार ? शेवटीं हें प्रकरण व्यवस्थापकांनीं नंतर गव्हर्नर जनरलाकडें पाठविलें. हा नियम बदलावयाचा का असा प्रश्न हिंदुस्थान सरकारापुढें उपस्थित झाला. परंतु गव्हर्नर जनरलानीं कायदा बदलण्यास परवानगी दिली नाहीं. विद्यासागरांसारखे थोर गृहस्थ म्यूझीयम पाहण्यास गेले नाहींत तरी चालेल; परंतु युरोपीय बुटाची इभ्रत कमी करण्यांत येणार नाहीं, असें सरकारनें कळविलें. ज्याप्रमाणें युरोपीयांसाठीं राखून ठेवलेल्या जागेंत एतद्देशीय आदमी शिरूं शकत नाहीं, त्याप्रमाणें जेथें बुटास जाण्यास अनुज्ञा आहे तेथेंच जोडे-वाहाणा, या एतद्देशीय पादत्राणांस कसा परवाना मिळणार ? जेत्यांचा कुत्राही जितांच्या ऐरावतापेक्षां ऐपतवान असतो हें जगानें विसरून कसें चालेल ? पूर्वीं यंग साहेब आपल्या आसनावर स्थिर राहून ज्याप्रमाणें विद्यासागरांस चंबूगवाळें आटोपावें लागलें, तसेंच या वेळेसही हिंदी जोड्यांस युरोपीय बुटापुढें माघार घ्यावी लागली व तो पहिला कायदा तसाच राहिला.

पुढें एकदां या म्यूझियमच्या पलीकडील दिवाणखान्यांत एक सभा भरावयाची होती. या सभेंत जावयाचें म्हणजे मार्ग म्यूझीयममधूनच असे. या सभेस विद्यासागर यांनीं हजर राहावें अशी चालकांची इच्छा होती, परंतु 'जोडे काढून ठेवा' असा जेथें नियम आहे, त्या जागेंतून मी केवळ विद्यासागर म्हणून जोडे घालून जाणें व मग या सभेस हजर राहाणें हें त्यांस रुचलें नाहीं. जोडा काढून जावें तरीही अपमानच. म्हणून ते या सभेस गेले नाहींत.

मोठमोठ्या गव्हर्नरांसमोर सुद्धां विद्यासागर निःस्पृहपणें वागत. एकदां गव्हर्नर साहेबांच्या कायदेमंडळांत हिंदुधर्मासंबंधीं कांही प्रश्न निघाला व त्यावर बरीच चर्चा झाली. शेवटीं वादाचा निकाल लागेना. विद्यासागरांस बोलावून आणून त्यांस सर्व उलगडा करावयास सांगावें असें ठरून विद्यासागरांकडे गव्हर्नर साहेबांनीं गाडी पाठविली. विद्यासागर यांची आई नुकतीच निजधामास गेली होती त्यामुळें ते त्या वेळेस अशौच पाळीत होते. अंगांत कपडे घालावयाचे नाहींत. फक्त एक पंचा नेसावयाचा असें त्यांचें व्रत होतें. जर कोठें जावयाचें असेल तर कुशासन बरोबर घेऊन जावें व त्याच्यावर बसावें असा पूर्वापार अशौचासंबंधींचा तिकडे आचार होता. "मी हा आहें असा येईन. मी अंगांत कपडा वगैरे घालणार नाहीं. असा उघडा बोडका आलों तर चालेल का? तुमचा सभ्याचार नाहींतर मोडला जाईल. म्हणून काय तें कळवावें." असें विद्यासागरांनीं गव्हर्नरांस कळविलें. "कसेही या. आम्हांस तुम्ही वंद्य व पूज्यच आहांत." असें गव्हर्नरांचें उत्तर आलें. विद्यासागर यांनीं आपलें कुशासन बरोबर घेतलें व पादचारीच गव्हर्नर साहेबांच्या बंगल्यावर गेले. कुशासनावर बसून त्यांनीं त्या धार्मिक प्रश्नांचा नीट समाधानपूर्वक ऊहापोह केला व सर्वांचे संशय फेडून टाकले; नंतर लगेच आपल्या घरीं ते परत आले. 'निःस्पृहस्य तृणं जगत्' अशा प्रकारें विद्यासागरांच्या ठिकाणीं भूतदया, साधेपणा, निरहंकारवृत्ति आणि स्वाभिमान यांचें सुंदर मिश्रण झालें होतें. निरहंकारी असूनही मनुष्य स्वाभिमानी असूं शकतो हें विद्यासागर यांनीं दाखविलें आहे. निरहंकारता म्हणजे दीनपणा व मवाळपणा नव्हे. स्वाभिमान म्हणजे दुसऱ्यांस सदैव तुच्छ लेखणें हें पण नव्हे, असें विद्यासागरांनीं आपल्या वागणुकीनें जगास दर्शविलें आहे.

विद्यासागरांस पापाची घाण अगदीं सहन होत नसे. सर्वांत जर कशाचा जास्त तिटकारा त्यांस येत असेल तर तो पापाचा. या बाबतींत त्यांचें मन फार हळुवार असे. जरा झालेला अत्याचार ऐकून ते कावरे बावरे व्हावयाचे. भाऊ शंभुचंद्र हा ईश्वरचंद्रांच्या मुलाचे फार लाड करी. शंभुचंद्र व ईश्वरचंद्रांचा मुलगा नारायण हे नेहमीं एकमेकांबरोबर असावयाचे. शंभुचंद्रानें नारायणास कोठें तरी अशा ठिकाणीं नेलें कीं जेथें घाण होती, कांहीं तरी अपवित्र होतें. ही गोष्ट विद्यासागरांचे कानावर गेली. खरी हकीकत काय ती सध्यां उपलब्ध नाहीं, परंतु विद्यासागर यांनीं आपल्या एकुलत्या एक मुलाचे पुनश्च मुखाव-

लोकन न करण्याचें ठरविलें. विद्यासागरांची पत्नी मात्र मुलाजवळ राहिली. बायकोचें व मुलाचें दर्शन विद्यासागर यांनीं घेतलें नाहीं. परंतु पुढें पत्नी आजारी असतां नारायण यानें विद्यासागरांस अत्यंत करुण असें पत्र लिहिलें. विद्यासागर आपला निश्चय पराकाष्ठेस नेणारे नव्हते. ते आसन्नमरण पत्नीस भेटावयाला गेले. सुखदुःखाच्या गोष्टी त्यांनीं केल्या. परंतु पुढें पत्नी मेल्यावर पुनश्च पुत्राकडे ते विशेष कधीं गेले नाहींत.

त्यांच्या एका मित्रानें असेंच कांहीं तरी अनैतिक वर्तन केलें होतें. मद्यपान मंडळींत किंवा कोठें तरी त्या मित्राचा पाय घसरला व नैतिकदृष्ट्या वाईट असें त्याच्या हातून घडलें. विद्यासागर व हे, दोघेजण मोठे स्नेही, परंतु असें अल्पही वाईट आचरण घडलें, तरी विद्यासागरांस खपणार नाहीं हें त्या गृहस्थास माहीत होतें. विद्यासागर त्याच्याकडे गेले नाहींत. कारण आपल्या मित्रानें शेण खाल्लें हें त्यांस कळलें होतें. त्यांस वाईट वाटलें व मनांत ते रडत राहिले. शेवटीं चार पांच दिवस झाल्यावर पश्चात्तापानें पोळलेला तो गृहस्थ विद्यासागरांकडे आला. काय बोलावें हें त्यांस समजेना. शेवटीं त्यानें विद्यासागर यांची मोठ्या नम्रपणें व कळकळीनें क्षमा मागितली. "मनुष्य स्खलनशील आहे. क्षमा करणारा परमेश्वर आहे. परंतु तुम्ही पुनरपि च्युत होऊं नका; रोज परमेश्वरास आळवा" असें विद्यासागर म्हणाले.

विद्यासागर यांच्या मातृग्रामीं एक पुनर्विवाह व्हावयाचा होता. या विवाहास हजर राहावें म्हणून विद्यासागर आपल्या गांवीं गेले होते. परंतु ग्रामाचा मुख्य जो ग्रामणी त्यानें व इतर सभ्य गृहस्थांनीं, विद्यासागरांबद्दल व पुनर्विवाहाबद्दल जरी त्या सर्वांस सहानुभूति होती तरी, त्यांनीं विद्यासागरांस पुनः पुनः विनविलें कीं, "आपण या पुनर्विवाहास हजर राहूं नये. त्या पुनर्विवाहांत कांहीं तरी घाण, किळसवाणां प्रकार असावा असें विद्यासागर यांनीं ताडिलें व ते पुनः कलकत्त्यास निघून आले. एक पुनर्विवाह म्हणजे फार मोठें कार्य असें ज्यांस वाटे, ते विद्यासागर या पुनर्विवाहांत कांहीं वाईट, घाण आहे असें कळतांच ताबडतोब निघून येतात हें पाहून तुम्हांस आश्चर्य वाटेल. परंतु विद्यासागरांस सर्वांत शील प्यारें होतें. त्यांस प्रथम चारित्र्य पाहिजे होतें. स्त्रियांचें चारित्र्य शुद्ध राहावें म्हणून तर पुनर्विवाहाचा जन्म होता. यासाठीं तर पुनर्विवाहाच्या चळवळीस त्यांनीं जन्म वाहिला होता.

घाणेरड्या संबंधावर पांघरूण घालण्यासाठीं ते पुनर्विवाह प्रचारांत आणूं पाहात नव्हते.

यानंतर प्रकरणास निराळेंच स्वरूप प्राप्त झालें. ईश्वरचंद्रांचे भाऊ शंभुचंद्र दिनानाथ हे सुद्धां त्या वेळेस मातृग्रामीं आले होते. या पुनर्विवाहांत जे भटजी काम करणार होते, त्यांस तर पुनर्विवाह अवश्यमेव झाला पाहिजे असें वाटत होतें. त्यांनीं शंभुचंद्रांची मनधरणी केली, व ईश्वरचंद्र नाहींत तर आपण तरी या पुनर्विवाहास मदत करा अशी त्यांस विनंती केली. शेवटीं विद्यासागरांच्या घराशेजारच्या घरीं हा पुनर्विवाह-समारंभ झाला. जो समारंभ होऊं नये म्हणून मी कलकत्त्यास पुनः परतलों, तो समारंभ माझ्या घराशेजारीं व्हावा याचें विद्यासागरांस फार वाईट वाटलें. आतां या गांवांस तोंड कसें दाखवावें असें त्यांनां झालें. त्यांनीं आपल्या प्रिय मातृभूमीस पुनरपि न जाण्याचें ठरविलें. एक मोठें करुण असें पत्र त्यांनीं ग्रामणीस लिहिलें व आपला निश्चय त्यास कळविला. आईबापांस भेटावयासही ते या गांवीं जात नसत. या लग्नास शंभुचंद्रांनींच मदत केली. ज्या गृहस्थानें या वेळीं विधवेजवळ विवाह केला, त्या गृहस्थाचें एक पत्र उपलब्ध आहे. आणि त्या पत्रांत त्यानें स्वच्छ लिहिलें कीं, शंभुचंद्रांची मदत न होती तर हें लग्नकार्य सिद्धीस गेलें नसतें. आपल्या भावानें अशा प्रकारें गोष्ट करावी याचें विद्यासागरांस राहून राहून फार वाईट वाटे. मातृभूमीची आठवण होऊन ते खिन्न होऊन बसत. परंतु केलेला निश्चय त्यांनीं मोडला नाहीं.

वरीलप्रमाणें पापापासून दूर दूर राहावें, अलिप्त असावें याविषयीं विद्यासागरांचा मोठा कटाक्ष. पुण्याजवळ परमेश्वर असतो; पावित्र्याजवळ परमेश्वर असतो; तें जेथें असेल तेथें ते जात. जेथें दुःख, दारिद्र्य आहे तेथें ते जात; परंतु जेथें घाण तेथें त्यांचा प्राण कासावीस होई. पापाशीं संपर्क येऊं नये म्हणून आईबाप, आपली जन्मभूमि, आपले भाऊ, आपली पत्नी, आपला एकुलता एक मुलगा, आपले जिवलग स्नेही सर्वांचे संबंध सोडण्यास तोडण्यास ते कष्टानें तयार झाले. “ सर्वांचा वियोग मी सहन करीन; परंतु पुण्यवृत्तीचा वियोग मी सहन करणार नाहीं ” असें ते मनांत म्हणावयाचे. त्यांच्या मनाची थोरवी मी क्षुद्रमति किती सांगणार ?

विद्यासागर यांची मातृपितृभक्ति अलौकिक, अवर्णनीय होती. त्यासंबंधीं पुष्कळ उल्लेख मागें आले आहेत. पुंडलीकानें आईबापांची सेवा करीत

असतां भेटीस आलेल्या पांडुरंगाला उभें राहावयास वीट दिली व आपण स्वतः आईबापांचे चरण चुरीतच राहिला; तसेंच विद्यासागरांचें. आई-बापांपेक्षां थोर अशीं अन्य दैवतें जगांत कोठें आहेत? आईच्या शब्दांप्रमाणें वागतां यावें म्हणून विद्यासागरांनीं नोकरीवर पाणी सोडलें; नावाडी पाण्यांत नौका लोटण्यास धजावत नसतां भरदुथडी भरलेल्या दामोदर नदींत त्यांनीं स्वतःचें शरीर आईचें नांव घेऊन निःशंकपणें फेंकलें; तेव्हां त्यांची मातृभक्ति व पितृभक्ति कोणत्या प्रतीचा होती तें वाचकांनीं मनांत ठरवावें.

विद्यासागर यांनीं पुनर्विवाहाची चळवळ केली, तिला त्यांच्या आई-बापांचें पाठबळ होतें. ज्या वेळेस विधवविवाहावरील आपला ग्रंथ विद्या-सागरांस प्रसिद्ध करावयाचा होता त्या वेळेस ते आपल्या वडिलांकडे गेले व म्हणाले, 'मी हा ग्रंथ प्रसिद्ध करूं का? आपण त्यामुळें खिन्न व नाराज होणार नाहींना?' 'समज, मीं परवानगी दिली नाहीं, तर तूं आपला ग्रंथ प्रकाशित करशील का?' असें ठाकुरदासांनीं विचारिलें. 'छेः कालत्रयींही अशी गोष्ट माझे हातून होणार नाहीं, मी माझा ग्रंथ तसाच ठेवीन व मग केव्हां तरी प्रसिद्ध करीन.' विद्यासागरांचें हें विनयशील बोलणें ऐकून भक्ति-पूर्ण उत्तर ऐकून ठाकुरदास प्रसन्न झाले व त्यांनीं तें पुस्तक प्रसिद्ध करण्यास परवानगी दिली. नंतर विद्यासागर आईकडे गेले व म्हणाले, 'आई, हें मीं पुस्तक प्रसिद्ध केलें, तर मी अधर्मी आहें असें तर नाहींना तुला वाटणार? तुला त्या योगें दुःख नाहींना होणार? तुला आनंद होत असेल, तूं अनुज्ञा दिलीस, तर मी हें पुस्तक प्रसिद्ध करीन.' मुलाचें म्हणणें ऐकून आईचेंच हृदय तें, भरून आलें. विद्यासागरांची आई प्रेमाची मूर्ति होती. भूतदयेची सिंधु होती. ती फार विचारी होती. विवेकास पटेल तेंच ती करी. मूर्तिपूजा वगैरे तिला अवडत नसे. ती ब्राह्मो नव्हती; परंतु तिच्या माहेरीं मोठेमोठे पंडित झालेले यामुळें तिची बुद्धि सूक्ष्म व कुशाग्र होती. अर्थात् तिनें मोठ्या प्रेमानें मुलास परवानगी दिली व म्हणाली, 'तुझ्या करण्याला माझें मनापासून अनुमोदन आहे. ज्यांचें जीवित केवळ कष्टमय आहे, एकेक दिवस ज्यांस युगाप्रमाणें वाटतो, ज्यांची सर्वांनीं विटंबना करावी, हेटाळणी करावी, ज्यांचें मुखावलोकन करणें म्हणजे अपशकून समजण्यांत येतो, मरेपर्यंत ज्यांस अश्रु ढाळावे लागतात, जे कधीं खळत नाहींत, जे पुसून टाकण्यास कोणी सहृदय मनुष्य नाहीं, सुखाचा गोड शब्द ज्यांस ऐकावयास मिळत नाहीं, सुखाचा

गोड घास ज्यांस खावयास मिळत नाहीं, कामाचे डोंगर ज्यांनीं उचलावे, परंतु फुकाचें 'दमलात हो' असें ज्यांस कोणी म्हणावयाचें नाहीं, ज्यांस भविष्यकाळ व वर्तमानकाळ म्हणजे निराशा व दैन्य यांनींच भरलेला दिसतो, नेहमीं दुसऱ्याचें गुलाम व्हावें, आणि यांचें मात्र सर्वजण धनी व हुकूम फर्मावणारे, अशा हताश दुर्बल दीन बायांची आपत्ति तूं दूर करूं पहात आहेस. केवढें सत्कृत्य आहे हें, बाळ. तुझ्या कार्यांत परमेश्वर यश देवो.' आईचें हें उत्तेजनपर भाषण ऐकून विद्यासागरांस फार सुख झालें. आपल्या कार्यानें आपल्या आईस एवढा आनंद होतो आहे हें पाहून विद्यासागरांच्या अंगावर मूठभर मांस चढलें, आणि पुढें त्यांनीं तो ग्रंथ प्रसिद्ध केला.

आईबापांची पूजा हा त्यांचा धर्म होता. विद्यासागरांचे धार्मिक विचार, धर्मसंबंधीं मतें कोणास माहित नाहींत. या बाबतींत ते आगदीं मुग्ध राहात असत. ते हिंदुधर्मांतच होते, परंतु ते कधीं देवदर्शनाला वगैरे जावयाचे नाहींत. परमेश्वराची पूजा ते मानसिकरीत्या कदाचित् करीत असतील. त्यांस मूर्तिपूजा फारशी मान्य नसावी. त्यांच्या आईससुद्धां ही आवडत नसें हें आतांच वरतीं सांगितलें आहे. कधीं कधीं ते म्हणत, "मला अन्य देव माहीत नाहीं. मी आपली आईबापांची पूजा करितों. त्यांची सेवा करावी, त्यांस संतुष्ट राखावें त्यांच्या इच्छा पूर्ण कराव्या हा धर्म सोपा व सरळ आहे. निदान माझा तरी तोच धर्म आहे." विद्यासागर त्या वेळेस प्रसिद्ध असलेल्या व जे हल्लीं देवाप्रमाणें मानले जातात, त्या रामकृष्ण परमहंसाकडे-सुद्धां कधीं गेले नाहींत. रामकृष्णच मग आपण होऊन एकदां विद्यासागरां-कडे गेले होते, व त्या दोघांचा मोठा मार्मिक संवाद झाला. "आज मी सागराकडे आलों आहे, मला आतां समाधान झालें" असें रामकृष्ण म्हणाले. "परंतु सागर असला तरी तो तृषा शांत करूं शकत नाहीं; पाण्यानें भरलेला, परंतु तोंडांत चूळ घेण्याची सोय नाहीं" असें विद्यासागर हंसत म्हणाले. "परंतु हा विद्येचा सागर आहे" असें रामकृष्ण म्हणाले, "त्याच्या कांठीं जाऊन मिळणार काय? वाळू, रेती, माशांचीं हाडें, शिंपा, दुसरें काय मिळणार आहे?" असें विद्यासागर म्हणाले. अशा प्रकारें दोघांचा सुखसंवाद चालला. एकमेकांस पाहून दोघेही समाधान पावले, तृप्त झाले.

विद्यासागरांचा धर्म आंतरिक होता; हृदयाचा होता. त्यांचा धर्म मनोमय होता. आपलें मन पवित्र ठेवा म्हणजे तुम्ही अत्यंत धार्मिक आहांत असें ते म्हणत.

अशा प्रकारें ईश्वरचंद्रांनीं आपलें मन पवित्र ठेवलें. त्यास कसलीही घाण लागूं दिली नाहीं. त्यांची स्वतःच्या कर्तव्यावर श्रद्धा असे. या श्रद्धेच्या जोरावर त्यांचा निश्चय अढळ असे. निरनिराळ्या वेळीं अनेक संकटें त्यांच्या-वर आलीं, परंतु त्यांनीं हातीं घेतलेलें प्रारब्ध कार्य कधीं सोडलें नाहीं. त्यांनीं ध्येय समोर ठेवून प्रयत्नांची पराकाष्ठा करावी, संकटांस तोंड द्यावें असें चाले. प्रयत्नांत शैथिल्य कधीं आलें नाहीं. या अखंड प्रयत्नांस पुरवठा कोण करी? तर श्रद्धा व निश्चयात्मिका बुद्धि. लहानपणापासून विद्यासागर निश्चयी असत. एकदां एक गोष्ट करीन म्हटलें म्हणजे ते करायचेच. ६।७ वर्षांचे असतांना ज्या वेळेस त्यांचे वडील त्यांस कलकत्त्यास आणीत होते, त्या वेळेस ठाकुरदास विद्यासागरांस विचारते झाले. " ईश, तूं वाटेंत चालशील का? का बरोबर गडी घेऊं." " नको, मी चालेन." असें विद्यासागरांनीं उत्साहांत बालपर्णीच्या धैर्यानें उत्तर दिलें. परंतु वाटेंत विद्यासागर दमले. त्यांच्यानें पाऊल पुढें टाकवेना. 'चालेन,' असें तर बापास सांगितलेलें. शेवटीं निरुपाय होऊन विद्यासागर म्हणाले, 'बाबा, आतां माझ्यानें चालवत नाहीं.' 'मग येतांना कबूल कां केलेंस,' असें म्हणून ठाकुरदास त्यास ओढूं लागले. त्यांनीं त्याला खूप मारलें सुद्धां, पण ईश्वरचंद्र म्हणाले, " मारा, पण पाऊल टाकणार नाहीं. कारण माझ्यानें टाकवत नाहीं." शेवटीं बापास खांद्यावरून त्यांस घेऊन जाणें भाग पडलें. अशा करारी व निश्चयी स्वरूपाचे ते होते. या दोन अभिजात गुणांच्या जोरावरच ते मोठे झाले. सुधारणा करणारे झाले.

सर्व कामें करीत असले तरी नवीन ज्ञान मिळविण्याबद्दल ते उत्सुक असत. २५ व्या वर्षी ते इंग्रजी शिकले आणि त्यांत त्यांनीं प्राविण्य अप्रतिम मिळविलें. मोठमोठीं पुस्तकें इंग्रजींत त्यांनीं लिहिलीं. तत्त्वज्ञानावरचे अगदीं अर्वाचीन ग्रंथही ते वाचावयाचे. त्यांच्या हृदयाच्या खिडक्या उघड्या असून मनाचे दरवाजे नूतन प्रकाश घेण्यास सदैव उघडे असत. ज्या फ्रेंच तत्त्वज्ञाचें तत्त्वज्ञान नुकतेंच इंग्रजींत प्रसिद्ध होऊं लागलें होतें त्या कॉम्टच्या तत्त्व-ज्ञानाची त्यांची माहिती पाहून एक बडे विद्वान् कसे स्तंभित झाले हें पूर्वी एके ठिकाणीं सांगितलेंच आहे. ते ज्ञानाचे अधाशी होते. कणकण विद्या मिळवून ते खरे विद्यासागर झाले. गटेप्रमाणें More light, 'आणखी प्रकाश' हेंच त्यांचें जीवन-सूत्र होतें. मरेपर्यंत त्यांचा अभ्यास, वाचन चाललें होतें. ते विद्यादेवीचे एकनिष्ठ उपासक होते. हिंदुस्थानचा इतिहास ते

मरतांनां लिहीत होते. हें पुस्तक आपण पुरें करूं शकणार नाहीं हें पाहून त्यांनीं तें दुसऱ्याच्या हवालीं केलें. परंतु तें तसेंच कोठें तरी काळाच्या पोटांत आज गडप झालें आहे. सारांश नेहमीं त्यांचें मन ज्ञानोत्सुक असे.

विद्यासागरांमध्यें कांहीं दोषही असतील परंतु ते आम्हांस माहीत नाहींत. एकच त्यांचा दोष कोणी दाखवितात कीं, त्यांस आपल्या बरोबरीच्या लोकांत काम करतां येत नसे. दोन सिंह एकत्र राहूं शकत नाहींत, दोन तरवारी एका म्यानांत राहणार नाहींत. टिळकांच्यावरही असाच आरोप आहे. सामान्य लोकांत मोठें होऊन मिरवावें असा टिळकांवर आरोप आहे. परंतु विद्यासागरांवर हा आरोप कां येतो हें समजत नाहीं. यंगसाहेबाबरोबर त्यांचें पटलें नाहीं. बेथून मेल्यावरती त्या इंस्टिटयूटचे मालकांजवळ, चालकांजवळ न पटल्यामुळेंच विद्यासागरांस संस्थेशीं संबंध सोडावा लागला. परंतु विद्यासागरांचें बिनसण्याचें कारण अहंकार नसून, स्वतःच्या कर्तबगारीची फाजील घमेंड हें नसून, त्यांच्या नीतिबद्दलच्या तीव्र कल्पना हें आहे. दुसरा मनुष्य जरा अन्याय करितो आहे असें जर त्यांस दिसून आलें तर ते तेथून निघून जात. बेथून व विद्यासागर यांचें नाहीं का आजन्म प्रेम व स्नेहसंबंध राहिले ? बेथून हाही एक मोठा कर्तबगार व थोर पुरुष होता. परंतु बेथून यांच्या ठिकाणीं घाण विद्यासागरांस दिसली नाहीं. तेथें सर्व सोनें दिसलें म्हणून ते त्यास चिकटून राहिले.

तेव्हां वरील आरोप सुद्धां खरा असेल असें वाटत नाहीं. त्यांच्या गुणांचा अतिरेक हा दुर्गुण फार तर त्यांच्या अंगीं चिकटवतां येईल; आणि समजा कांहीं किरकोळ दोष असले, तरी या गुणरत्नाकराकडे पाहतां ते कोठल्या कोठें लपून जातात, अदृश्य होतात. 'एकोहि दोषो गुणसन्निपाते निमज्जतीन्दोः किरणेष्विवांकः' हेंच खरें. डागामुळें चंद्रास शोभा आहे. दैदीप्यमान सहस्रकरावरही म्हणे डाग आहेत. जें मर्त्य आहे, जें भौम आहे, त्यांत थोडा फार भूमीचा अंश, लघुत्वाचा अंश असणारच. परंतु दैवी अंश किती थोर आहे हें पाहून आपण त्यास वंदावें. ईश्वरचंद्रांमध्यें हे दैवी गुण पराकाष्ठेस पोंचले होते. ते भव्य व सुंदर आहेत; पवित्र व निष्कलंक आहेत. विद्येचे सागर व प्रेमाचे आगर असे ते आहेत. ते भूतदयेचे सिंधु आहेत; कर्तव्याचे मेरू आहेत. त्यांच्याकडे पाहून सर्वांनीं थोर होण्याचा प्रयत्न करावा; पापापासून परावृत्त होऊन सच्छील, कर्तव्यरत आणि परोपकारपरायण होण्याचा, शक्त्यनुसार दुःखितांचे अश्रु पुसण्याचा आपण सर्वांनीं निश्चय करावा म्हणजे झालें.

प्रकाशक :
दयार्णव रघुनाथ कोपर्डेकर,
५२९ सदाशिव, पुणें २.



नवीन प्रकाशनें



गांवगुंड
ग. ल. ठोकळ
बोलघेवड्या
ना. धों. ताम्हणकर
चौफुला
आचार्य भागवत
दुसरी आघाडी
अ. ज. करंदीकर